# समर्पण

## परमपूज्य कै. श्रीमन्महाराज शिवाजीराव होळकर सरकार
### इंदोर संस्थानाधिपति



यांच्या पवित्रचरणीं त्यांचे परमपूज्य गुरु व स्वामिनिष्ठ सेवक कै. रा. ब. विनायक जनार्दन कीर्तने यांचीं विद्वन्मान्य नाटकें व त्यांचें चरित्र हीं पुष्पें प्रेमादरपूर्वक अर्पण केलीं आहेत.

इंदोर संस्थानचे राजनिष्ठ सेवक,

प्रकाशकः— { **वामन नरहर कीर्तने.**
**मनमोहन दामोदर कीर्तने.**

बालोद्यान प्रेस, ६८९ सदाशिव, पुणें.

मुद्रक

वि. पु. पेंढरकर, टयुटोरियल् प्रेस,
२११ अ, गिरगांव ब्याकरोड, मुंबई.

प्रकाशक

वामन नरहर कीर्तने

आणि

मनमोहन दामोदर कीर्तने

कीर्तने-एस्टेट, पोस्ट मुंढवा, जिल्हा पुणें.

# अनुक्रमणिका

# कै. रा. ब. विनायक जनार्दन ऊर्फ बाबासाहेब कीर्तने



माजी मुख्य दिवाण, इंदोर स्टेट.

जन्म—भाद्रपद शुद्ध ४ शके १७६३.

मृत्यु—ता. १८ डिसेंबर सन १८९१

बालोद्यान प्रेस, पुणे.

## कै. रा. ब. विनायक जनार्दन ऊर्फ बाबासाहेब कीर्तने,




माजी मुख्य दिवाण, इंदोर स्टेट

यांची जन्मलग्नकुंडली.

# प्रकाशकांचे दोन शब्द

आमचे अत्यंत पूज्य व वंदनीय आजे कै. ती. रा. ब. विनायक जनार्दन ऊर्फ बाबासाहेब कीर्तने, माजी मुख्य दिवाण इंदूर, यांचें चरित्र व त्यांचीं अत्यंत मोल्यवान अशीं 'जयपाळ' व 'थोरले माधवराव पेशवे' हीं दोन नाटकें आज प्रसिद्ध करण्याचा सुयोग परमात्मा श्रीपांडुरंगकृपेनें आला याबद्दल त्या सर्वशक्तिमान् व अत्यंत दयाळु अशा प्रभुरायाचे आभार मानावे तितके थोडेच होत, व कितीही शब्द आभार मानण्याकरतां खर्च केले तरी ते अपुरेच पडतील.

हीं नाटकें इतकी सुंदर असतां व लोकांची फार मागणी असतां केवळ प्रकाशनाच्या अभावीं नाटकांचें व नाटककारांचें व्हावें तितकें कौतुक आजवर झालें नाहीं, तरी पण यापुढें तरी ही उणीव भरून निघेल अशी खात्री आहे. प्रकाशनाचें काम नाटककारांचे सुपुत्रद्वय म्हणजे परमपूज्य वंदनीय कै. ती. रा. भय्या साहेब कीर्तने व कै. ती. रा. ब. दाजीसाहेब कीर्तने, माजी मुख्य न्यायाधीश, इंदोर रियासद, यांचे हयातींत व त्यांचेच हातून होणार होतें व तसें झालें असतें तर विशेष आनंद झाला असता. पण हें प्रकाशन त्यांच्या हातून कां झालें नाहीं हें सांगणें म्हणजे प्रभुरायाच्या अनंत लीलांपैकींच ती एक लीला असल्यामुळें सांगतां येणें शक्य नाहीं. मात्र एवढें खरें कीं दोघेही चिरंजीव अत्यंत मातृपितृभक्त असतां एवढी ही अमोलिक पितृसेवा कांहीं तरी अपरिहार्य कारणामुळें त्यांच्या हातून राहिली असावी असें मानण्यास हरकत नाहीं. किंवा आजच्याप्रमाणें सर्वश्रेष्ठ अशा मुंबई विश्वविद्यालयाच्या एम्. ए. सारख्या अत्युच्च परीक्षेस मराठी भाषेकरितां त्यावेळीं जयपाळ नाटक ठेविलें नसल्यामुळें आजच्या इतकी आवश्यकता कदाचित् त्यांना त्यावेळीं भासली नसावी असेंही एक कारण असूं शकेल, किंवा आमच्या भाग्यांत ही अमूल्य सेवा करण्याचा योग विधात्यानें राखून ठेविला असावा ! कोण जाणे ! हीं नुसतीं अनुमानें आहेत. नक्की कारण मात्र कांहीं सांगतां येत नाहीं.

लौकिकरीत्या हें शाश्वत श्राद्ध आमच्या हातून यशस्वीपणें करविलें याबद्दल आमच्यावर श्रीप्रभुरायांचे अनंत उपकार आहेत. हें काम चालू असतां अनेक अडचणी आल्या. इतक्याही बिकट संकटांतून त्याच वाटाड्यानें मार्ग दाखविला व हीच गोष्ट खरी; व याचवेळीं ऐहिक क्षुद्रशक्तीपेक्षां सर्वश्रेष्ठ अशा पारमेश्वरी शक्तीची खरी कल्पना आम्हांला आली.

प्रकाशनाचा कदाचित् आतांही योग आला नसता. पण प्रो. दत्तोपंत पोतदार यांच्या मात्रेनें सर्व कामें बाजूस सारून हें काम हातीं घ्यावें लागलें; व या मात्रेच्या वळशाबद्दल प्रोफेसर मजकुरांचे प्रथम आभार मानतों.

अगदीं अल्पवयांत म्हणजे विसाव्या वर्षी जयपाळ व थोरले माधवराव पेशवे हीं सर्वमान्य नाटकें कै. ती. रा. ब. विनायकराव बाबा यांनीं रचिलीं. तीं इतकीं सर्वांगसुंदर झालीं कीं त्यांच्या तोडीचीं दुसरीं नाटकें महाराष्ट्र–भाषेंत क्वचितच सांपडतील. "भाषेसंबंधानें तर जयपाळ व माधवराव पेशवे हीं नाटकें अव्वल प्रतीचीं आहेत." असा शेरा अनेक विद्वान् ग्रंथकर्त्यांनीं अनेक ठिकाणीं देऊन ठेविला आहे. याला आणखी जोड पुरावा म्हणूनच कीं काय जयपाळ नाटक एम्. ए. सारख्या अत्युच्च परीक्षेकरतां ठेवण्याची योग्य निवड मुंबई युनिव्हर्सिटी सारख्या जगन्मान्य संस्थेनें केली ती योग्यच होय. याबद्दल मुंबई युनिव्हर्सिटीचे आभार मानावे तितके थोडेच होत.

इंदूरचे विद्वान् साहित्यसेवक ती. रा. बाळकृष्ण नारायण ऊर्फ बाळाभाऊ देव यांनीं सन १९०४ सालीं कै. ती. रा. ब. विनायकराव बाबांचें चरित्र लिहून आपल्या मामांचे अंशतः ऋण फेडिलें; तेव्हां अशा योग्य सरस्वतीपुत्राचे येथें आभार मानणें उचित आहे.

या दोन नाटकांसंबंधानें टाइम्स ऑफ इंडिया सारख्या वजनदार व जगन्मान्य पत्रानेंही फार प्रशंसापर उद्गार काढले आहेत. तसेंच रंगभूमि मासिकाच्या दुसऱ्या वर्षाच्या चवथ्या अंकांत मासिककर्त्यांनीं रा. ब. कीर्तने यांचें थोडक्यांत चरित्र दिलें आहे व दोन्ही नाटकांतून अत्यंत मनोहर प्रसंगाचे उतारे देऊन त्यांची फार प्रशंसा केली आहे. रा. शंकरराव मुजुमदार यांनीं 'महाराष्ट्रिय नाटककार' या नांवाचें एक स्वतंत्र पुस्तक तयार केलें आहे. त्यांत विनायकरावजींचें चरित्र, नाटकांतील प्रवेश व ग्रंथकर्त्यांचें

स्वतांचें मत असें एकत्रित केलेलें पहावयास सांपडेल. हा मजकूर वाचल्यानंतर आणखीं कांहीं प्रशंसापर लिहिण्याचें उरलें आहे असें वाटणार नाहीं. त्यांत एका मोठ्या राज्याचा मुख्य मंत्री या नात्यापेक्षां प्रसिद्ध नाटककार या नात्यानें रा. ब. विनायकराव यांचा विशेष गौरव केला आहे; व ती. बाळाभाऊ देवांनीं यशस्वी मंत्री म्हणून ती. विनायकरावजींचा सन्मान केला आहे. तें कसेंही असलें तरी मंत्रीपदाला व साहित्यकाराला लागणारे असे दोन्ही गुण विनायकरावजींमध्यें होते हें सिद्ध होतें. या दोन्ही गुणांचा एकाच व्यक्तीमध्यें झालेला परिपोष क्वचितच पाहण्यांत येतो. गतकालीन नाटककार व मंत्री यांना न विसरतां पूर्वोक्त भिन्न व्यवसायी गृहस्थांनीं त्यांस आपआपल्या मताप्रमाणें योग्य स्थान दिलें याबद्दल त्यांचे आम्ही ऋणी आहोंत.

कै. ती. रा. ब. विनायकरावजींसारख्या सन्माननीय थोर पुरुषाच्या कुलांत आम्हांस जन्माला घातलें याबद्दल त्या विश्वपति प्रभुरायाचे किती व कसे आभार मानावयाचे हेंच समजत नाहीं. पूर्वजन्माची कांहीं तरी सबळ पुण्याई असल्याशिवाय असल्या परस्पर विरोधी जोडगुणांच्या भाग्यवान् पुरुषांच्या वंशांत आम्हांला खास घातलें नसावें असें खात्रीपूर्वक वाटतें. तेव्हां अशा अत्यंत पुण्यवान्, थोर व वीर पूर्वजांची आमचे हातून जी ही अल्प सेवा झाली ती गोड करून घेण्याचें काम आम्ही वाचकांवर सोंपवितों.

या पुस्तकाच्या एका मोठ्या महत्त्वाच्या बाबीसंबंधानें येथें प्रामुख्यानें उल्लेख करणें अत्यंत आवश्यक आहे. आमचे पूज्य गुरुवर्य, परम रसिक कवि व विद्वान् ग्रंथकार प्रो. **लक्ष्मणशास्त्री लेले** यांस प्रस्तुत पुस्तकाची व्यवस्था पाहण्याविषयीं व त्याला प्रस्तावना लिहिण्याविषयीं विनंति करतांच ती त्यांनीं एकदम थोर मनानें मान्य केली व कौटुंबिक अडचणी व इतर अनेक व्यवसाय मागें असतांही प्रस्तुत कामगिरी त्यांनीं अत्यंत आस्थापूर्वक व फार प्रशंसनीय रीतीनें पार पाडिली याबद्दल **शास्त्री**बोवांचा स्तुतिवाद करावा तितका थोडा. किंबहुना असेंही म्हणतां येईल कीं गुरुवर्यांच्या असल्या मदतीशिवाय प्रस्तुत पुस्तक इतक्या सुंदर रीतीनें बाहेर पडलेंच नसतें. **शास्त्री**बोवांची प्रस्तावना फार मार्मिक, सरस, व्यापक व प्रस्तुत पुस्तकसंग्रहाचा सर्वांगीण व सुंदर परामर्ष घेणारी आहे. याबद्दलचें **शास्त्री**बोवांचें ऋण फेडणें अशक्य आहे.

आमचे बंधुवर्य ती. रा पंढरीनाथ कृष्ण राजूरकर यांचाही येथें कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणें आवश्यक आहे. यांचें बालपण व शिक्षण विनायकरावजींच्या घरींच झालें. हे हल्लीं आमच्या एस्टेटीचे कर्तृत्ववान् व्यवस्थापक आहेत. यांनीं प्रस्तुत ग्रंथाच्या प्रकाशनाच्या कामीं आम्हांस योग्य प्रोत्साहन दिलें व अशा रीतीनें आपल्या पालनकर्त्यांचें अंशतः ऋण फेडिलें हें त्यांस भूषणावह व आम्हांस संतोषदायक आहे. तसेंच ती. मातुश्री डॉ. सुंदराकाकी कीर्तने, एल्. एम्. एंड एस्., ( चरित्र नायकांची ज्येष्ठ स्नुषा ), ती. रा. रंगोपंत पाथरकर, व चि. रा. विनायक नरहर कीर्तने यांनींही प्रस्तुत पुस्तकाच्या प्रकाशनासंबंधानें उत्तेजन दिलें व सर्व प्रकारांनीं सहानुभूति दर्शविली याबद्दल आम्हांस परम संतोष वाटत आहे.

पुणें बालोद्यान-प्रेसचे मालक रा. सहस्रबुद्धे यांनीं या पुस्तकांत घातलेलीं छायाचित्रें आमच्या मनाप्रमाणें लवकर तयार करून दिलीं यासाठीं त्यांचे व मुंबई येथील ट्युटोरियल प्रेसचे मालक व व्यवस्थापक श्रीयुत वि. पु. पेंढरकर यांनीं मुद्रणाचें काम फार सुंदर रीतीनें व झटपट करून दिलें याबद्दल त्यांचेही मनःपूर्वक आभार मानतों.

कीर्तने एस्टेट,<br>
पोष्ट मुंढवा, जिल्हा पुणें.<br>
कार्तिक वद्य एकादशी,<br>
शके १८४९<br>
१९-११-१९२७ इ.

**वामन नरहर कीर्तने.**<br>
**मनमोहन दामोदर कीर्तने.**

---

# प्रस्तावना



कै. रा. ब. विनायक जनार्दन कीर्तने यांनीं ' थोरले माधवराव पेशवे ' व ' जयपाळ ' हीं नाटकें व इंदूरचे प्रसिद्ध शारदोपासक रा. बाळकृष्ण नारायण देव यांनी लिहिलेलें रावबहादुरांचें चरित्र अशा तीन पुस्तकांचा हा संग्रह आहे. याला प्रस्तावनेदाखल चार शब्द लिहिण्याविषयीं रावबहादुरांचे नातू राजश्री वामन नरहर कीर्तने यांनीं आम्हांस विनंति केली. आमचा व राजश्री कीर्तने यांचा गुरुशिष्यसंबंध होता; व त्यांचे आजोबा तर जुने मराठी नाटककार व मुत्सद्दी या नात्यानें आम्हांस आदरणीय आहेत. अशा दोन कारणांनीं, विशेष कौटुंबिक अडचणी असतांही, राजश्री कीर्तने यांची विनंति आम्हांस अमान्य करवेना.

रावबहादुरांचे कनिष्ठ चिरंजीव कै० दाजीसाहेब यांच्या प्रोत्साहनानें रा. देवांनीं लिहिलेले रावबहादुरांचें चरित्र प्रसिद्ध झालें हें दाजीसाहेबांस भूषणास्पद आहे. तथापि मराठी भाषेत एका काली विशेष नांवाजलेलीं ' थोरले माधवराव पेशवे ' व ' जयपाळ ' हीं आपल्या वडिलांची नाटकें स्वतंत्र रीतीनें मुद्रित करण्याचा प्रयत्न, सर्व प्रकारची अनुकूलता असतांही, रावबहादुरांच्या दोन्ही चिरंजीवांच्या हातून होण्याचा योग आला नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट आहे. आतां फारां दिवसानी कां होईना पण तें काम रावबहादुरांच्या नातवांनीं अंगावर घेऊन योग्य रीतीनें पार पाडिलें याबद्दल त्यांचें अभिनंदन करणें उचित आहे.

गेल्या शतकाच्या मध्याच्या सुमारास खालसा मुलखांत मुंबईपुण्याकडे शिक्षणाचा व ग्रंथलेखनाचा प्रसार चालला होता. डॉ. भाऊ दाजी, बाळशास्त्री जांभेकर, हरि केशवजी, दादोबा पांडुरंग, माधव चंद्रोबा, बाबा पदमनजी, गोविंद नारायण माडगांवकर, भाऊ महाजन, विश्वनाथ नारायण मंडलीक, महादेवशास्त्री कोल्हटकर, कृष्णशास्त्री चिपळुणकर,

परशरामपंत गोडबोले, गोपाळराव देशमुख, केरुनाना छत्रे, इत्यादि बहुश्रुत, कर्तृत्ववान् व विद्वान् गृहस्थ या कामांत गुंतले होते. ज्ञानप्रसारक, दिग्दर्शन, सर्वसंग्रह, ज्ञानचंद्रोदय यासारखीं मासिकें; प्रभाकर, दर्पण, ज्ञानप्रकाश, विचारलहरी, ज्ञानोदय, ज्ञानसिंधु वगैरे वृत्तपत्रें आणि दक्षिणा-प्राइज-कमीटी, ज्ञानप्रसारक मंडळ, ट्राक्ट आणि बुक सोसायटी, सरकारी विद्याखातें, इत्यादि संस्था विद्याभिवृद्धीचें काम करीत होत्या. याच वेळेच्या सुमारास कोल्हापूर येथेंही अशा प्रकारचा प्रयत्न चालू होता. मुंबईचे रा. ब. नाना मोरोजी कोल्हापूरच्या रेसिडेन्सीमध्यें महत्त्वाच्या कामावर होते. ते मोठे गुणग्राही, विद्याभिलाषी, दूरदर्शी, उद्योगी व प्रागतिक होते. त्यांनीं खालसा मुलखांतल्या अनेक सुधारणा कोल्हापूर-संस्थानांत घडवून आणल्या. त्यांतून शिक्षणासंबंधाचे त्यांचे प्रयत्न तर कोल्हापूरच्या इतिहासांत नमूद करण्यासारखे आहेत. त्यांनीं कोल्हापूर येथें इ. स. १८४८ सालीं मराठी व १८५३ सालीं इंग्रेजी शाळा स्थापन केली. प्रस्तुतचें राजाराम हायस्कूल दुसरीचें रूपांतर आहे. नाना मोरोजी एवढेंच करून थांबले नाहींत. ज्ञानप्रसारार्थ त्यांनीं वर्तमानसंग्रह या नांवाचें वृत्तपत्र व ज्ञानसंग्रह या नांवाचें मासिक काढिले व चालविलें. यावेळीं रावबहादूर कीर्तने यांचे वडील जनार्दनपंत कोल्हापूरचे कारभारी असून त्यांच्या हाताखालीं न्या. मू. रानडे यांचे वडील गोविंदराव जबाबनिशीच्या कामावर होते. या ठिकाणीं जनार्दनपंत व गोविंदराव यांचा व त्यांच्या कुटुंबीय माणसांचा मोठा स्नेह व घरोबा झाला व तो पुढें दीर्घकाल टिकला. विनायकराव माधवरावांपेक्षां दोन वर्षांनीं वडील होते. त्या उभयतांचें मराठी व इंग्रजी शिक्षण वरील शाळांत झालें. त्यांचें परस्परांवर मोठें प्रेम होतें. विठ्ठलराव पाठक व माधवराव कुंटे हे त्यांचे यावेळचे नांव घेण्यासारखे सहाध्यायी होते. कोल्हापूरचें शिक्षण संपल्यावर कीर्तने, रानडे, पाठक व कुंटे हे विद्यार्थी पुढील शिक्षणाकरितां मुंबईच्या एल्फिन्स्टन् हायस्कुलांत प्रविष्ट झाले. सत्तावन सालच्या हिंदी सैनिकांच्या क्षोभाच्या ज्वाला उत्तर हिंदुस्थानांत भडकत असतां व त्यांची धग बृहन्-महाराष्ट्राच्या कित्येक भागाला लागत असतां मुंबईच्या प्रशांत वातावरणांत या विद्यार्थ्यांनीं विद्यादेवीच्या सात्त्विक उपासनेला आरंभ केला. पुढें लवकरच मुंबई विश्वविद्यालयाची प्राणप्रतिष्ठा झाली. त्यानें घेतलेल्या पहिल्याच प्रवेश-परीक्षेंत कोल्हा-

पूरचे वरील सर्व विद्यार्थी उत्तीर्ण झाले. कॉलेजामध्यें असतां यांच्या थोडें मागेंपुढें असणारे व्यवसायबंधु रामकृष्ण गोपाळ भांडारकर, बाळ मंगेश वागळे, फेरोजशहा मेथा, वामन आबाजी मोडक, आबाजी विष्णु काथवटे, शंकर पांडुरंग पंडित वगैरे होते. हे सर्वच पुढें विद्वान्, कीर्तिमान् व भाग्यवान् निघाले. विनायकराव कीर्तने पुढें दोन वर्षे म्हणजे १८६१ सालापर्यंत एलफिन्स्टन् कॉलेजामध्यें पगारी विद्यार्थी होते. कॉलेजांतील पहिल्या परीक्षेला ते एक दोन वेळां बसले परंतु त्यांस यश आलें नाहीं. यामुळें त्यांनीं कॉलेज कायमचें सोडिलें.

नाना मोरोजी यांनीं कोल्हापूर येथें तरुण पिढीला प्रेरक व प्रोत्साहक वातावरण कसें निर्माण केलें याचा उल्लेख वरतीं आला आहे. शीघ्रग्राही, बुद्धिमान् व तरतरीत विनायकरावांवर त्याचा परंपरया तरी परिणाम झाला असला पाहिजे. मुंबईच्या एलफिन्स्टन् कॉलेजांत सर अलेग्झँडर ग्रँट यांच्यासारखे स्वतंत्र बुद्धीचे, बाणेदार वृत्तीचे, उदार विचाराचे व मोकळ्या मनाचे अध्यापक मिळाल्यानें विनायकरावांस मोठाच लाभ झाला. गणितविषयाकडे विनायकरावांनीं दुर्लक्ष्य केलें. त्यामुळें त्यांचें कॉलेजांतील पुढचें उच्च शिक्षण खुंटलें व त्यांस पदवीधर होतां आलें नाहीं. पण सुदैवानें ही गोष्ट त्यांच्या भावी कार्यक्रमांत त्यांस नडली नाहीं. विद्यार्थी असतांना विनायकरावांचा ओढा ललितवाङ्मयाकडे विशेष असे. शेक्सपीयरचीं रसिकवन्द्य नाटकें, मेकॉलेचे नटवे निबंध, डिकेन्सच्या यथावद्दर्शन कादंबऱ्या, बायरनचीं रंगेल काव्यें, गोल्डस्मिथची प्रेमळ गद्यपद्यात्मक कृति, स्कॉटच्या चटकदार नवलकथा, जान्सनचीं विद्वन्मान्य कविचरित्रें, मेडोज टेलरच्या रोमहर्षण गोष्टी, मनोहर इतिहास-ग्रंथ व बखरी, यांच्या वाचनांत ते सदैव दंग असत. सफाइदार व ऐटबाज इंग्रजी भाषण व लेखन यांची त्या कालांत मोठी प्रतिष्ठा होती. या कला विनायकरावांनीं हस्तगत केल्या. पुढें इंदूर व बडोदें येथील दरबारावर छाप बसविण्याच्या कामीं यांचा विनायकरावांस मोठा उपयोग झाला. इंदोरचे रेसिडेंट सर रिचर्ड मीड पेनशनर होऊन विलायतेला परत जाऊं लागले त्यावेळीं इंदोर दरबारानें त्यांस मानपत्र अर्पण केलें. तें विनायकरावजींनीं लिहिलें होतें. त्याची इंग्रेजी भाषा पाहून रेसिडेंटसाहेब चकित व प्रसन्न झाले. विनायकराव इंग्रेजी कविताही रचीत. 'Poona forty years ago' या नांवाची

एक भली मोठी इंग्रेजी कादंबरी लिहिण्याचा त्यांचा प्रयत्न अर्धवटच राहिला. या ग्रंथाचीं पहिलीं चाळीस प्रकरणें इ. स. १८९७ सालीं ज्ञानप्रकाशांत प्रसिद्ध झालीं. त्यांवरून त्यांचें आंग्ल-भाषेवरील प्रभुत्व तर दिसून येतेंच पण यापेक्षां अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्या कादंबरींत रेखाटलेल्या काळाचें एक हुबेहूब चित्र होय. हा काळ अनेक दृष्टींनीं महाराष्ट्राच्या इतिहासांत महत्त्वाचा होऊन बसलेला आहे. हा ग्रंथ पुरा झाला असता तर एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांतील एक रम्य समाज-चित्रपट आपल्याला पहावयाला मिळाला असता. कै. वासुदेव महादाजी मुळ्ये, नाझीमसाहेब, इंदूरकर, हे विनायकरावांच्या लोभांतील एक वृद्ध व कर्तृत्ववान् गृहस्थ होते. आम्ही हायस्कुलांत विद्यार्थी असतां नासिकक्षेत्री यांचा व आमचा योग आला. विनायकरावांची रसिकता व त्यांचें आंग्लभाषानैपुण्य या विषयींच्या अनेक गोष्टी ते आम्हांस मोठ्या अभिमानानें व कौतुकानें सांगत असत.

विनायकरावांची मराठींत लिहिण्याची हौस व पात्रता त्यांच्या बाळपणींच दिसून आली. विष्णुबोवा ब्रह्मचारी व महादेवशास्त्री कोल्हटकर हे एकदा कोल्हापुराला गेले होते. तेव्हां विनायकराव अवघे बारा वर्षांचे होते. त्यावेळीं त्यांनी एक मराठी लेख लिहिला होता. त्याचें वरील विद्वानांनीं मोठें कौतुक केलें. पुण्यास दक्षिणा-प्राइज-कमीटी स्थापन झाल्यावरचा कांहीं काल भाषांतरयुग मानण्यास हरकत नाहीं. या कमीटीच्या प्रोत्साहनानें अनेक सुप्रसिद्ध संस्कृत काव्यनाटकांचीं मराठींत भाषांतरें झालीं. विनायकराव विद्यार्थी असतां गोडबोले–राजवाडे–लेले-प्रभृतींची भाषांतरकृति तयार झाली व ती त्यांच्या अवलोकनांत आली. मुंबई येथें विद्याभ्यास चालू असता विनायकरावांचा मराठी लेखनाचा व्यासंग चालला होता. त्यांनी कांहीं निबंध लिहून त्यावेळच्या ज्ञानप्रसारक नांवाच्या विद्वत्सभेपुढें वाचले. त्यांत शेवटचा व महाराष्ट्राच्या परिचयाचा लेख म्हणजे ‘ थोरले माधवराव पेशवे ’ हें नाटक होय. पुढें धुळें येथील हायस्कुलावर मुख्य गुरु असतां त्यांनीं आपलें दुसरें नाटक म्हणजे ‘ जयपाळ ’ हें लिहिलें व तें आपले सन्मान्य व प्रिय मित्र रा. ब. नाना मोरोजी ( हे यावेळीं धुळयास हु. डे. कलेक्टर होते ) यांस बहुमानपुरःसर समर्पण करून प्रकाशित केलें.

विनायकरावांचें शिक्षण व त्यांची प्रवृत्ति यांच्यावरून पाहतां त्यांच्यापुढें विद्यार्थिदशेनंतर एकच मार्ग खुला होता; व तो ग्रंथकर्तृत्व व अध्यापन हा होय. हाच मार्ग त्यांनीं स्वीकारला. त्यांनीं शाळाखात्यांत शिक्षकाचें काम पतकरलें. पुढें धुळें येथें ते हायस्कुलाचे हेडमास्तर झाले. नंतर त्यांची बदली कारवार येथील हायस्कुलावर झाली. पण तेथील हवा त्यांस मानवेना. दुसरीकडे बदली करून घेण्याचा त्यांच्या प्रयत्नाला यश आलें नाहीं. पुढें कोठें जावें व काय करावें या विवंचनेंत असतां, त्यांचा भाग्योदय ज्या ठिकाणीं व्हावयाचा होता, त्या इंदूर संस्थानांत विद्याधिकाऱ्याची जागा त्यांना मिळण्याचा योग आला. इ. स. १८६५ सालीं त्या जागेवर ते रुजू झाले. सहा वर्षेपर्यंत त्यांनीं तें काम केलें. पुढें ते युवराजगुरु झाले.

विनायकरावांच्या पूर्वचरित्रांतील ही कामगिरी विशेष लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे. अध्यापक व मराठी नाटककार या नात्यानें या काळांत त्यांनीं लौकिक संपादन केला. यासंबंधानें येथें थोडेसें लिहिणें आवश्यक आहे. साध्या गुरुपदापासून राजगुरुत्वाचा मान मिळेतोंपर्यंतचा विनायकरावाचा अध्यापनाचा लौकिक सर्वत्र आहे. त्यांची शिकविण्याची शैली मार्मिक व परिणामकारक असे असें म्हणतात. इंदूरचे सुप्रसिद्ध कै. रा. ब. कृष्णरावजी मुळ्ये, व वऱ्हाडकर कै. रा. ब. विष्णु मोरेश्वर महाजनी हे दोघेही विनायकरावांचे नामांकित विद्यार्थी होत. रा. ब. मुळे यांनीं आपल्या गुरूंच्या अध्यापनपद्धतीची फार तारीफ केली आहे. धुळ्याची लायब्ररी विनायकरावांनीं स्थापिली व लोकांस वाचनाची गोडी लाविली. इंदूर-संस्थानांत मराठी, उर्दू, हिंदी, संस्कृत वगैरे शिकविणाऱ्या शाळा विनायकरावांच्या प्रेरणेनें स्थापन झाल्या. सर्व शिक्षणाचे माध्यम मराठी असावें या मताचे विनायकराव होते व बडोद्यास नायब दिवाण असतांना त्यांच्या प्रयत्नानें तेथील मराठी कॉलेज अस्तित्वांत आलें. हें कॉलेज फार अल्पायुषी झालें ही गोष्ट शोचनीय आहे. विनायकराव इंदूर सोडून बडोद्यास गेले तेव्हां इंदोरकरांनीं त्यांस मानपत्र दिलें. मराठी काव्य-नीरक्षीर-विवेचक रा. हंस व रा. ब. टुल्लू यांनीं त्यांत पुरस्कार घेतला होता. त्यांत विनायकरावांचा विद्याव्यासंग, त्याचें अध्यापनकौशल्य व त्यांचें लेखनपटुत्व यांचा प्रामुख्यानें उल्लेख होता.

विनायकरावांनीं अध्यापक म्हणून कीर्ति मिळविली व विद्याधिकारी या नात्यानेंही ते यशस्वी झाले. तथापि त्यांचें मराठी ग्रंथकर्तृत्वच महाराष्ट्राच्या विशेष परिचयाचें आहे. 'थोरले माधवराव पेशवे' व 'जयपाळ' हीं दोन नाटकें विनायकरावांनीं पंचविशीच्या आंत लिहिलीं. पहिल्याचा परामर्ष मुंबईच्या ज्ञानप्रसारक संस्थेनें व तिच्या प्रमुख चालकांनीं म्हणजे डॉ. भाऊ दाजी, दादोबा पांडुरंग, विश्वनाथ नारायण मंडलीक इत्यादिकांनीं घेतला व ज्ञानप्रसारक मंडळानें तें आपल्या खर्चानें छापून काढलें. त्याची दुसरी आवृत्ती लवकरच इंदुप्रकाशांत निघाली. अल्प अवकाशांत दोन आवृत्त्या निघणें हें त्या पुस्तकाच्या लोकप्रियतेचें निदर्शक आहे. विनायक-रावांना बखरी, इतिहास वगैरे वाचण्याची फार आवड होती. माधवराव नाटक त्या आवडीचेंच फल असावें. या नाटकाचें त्याच्या कालांत बरेंच कौतुक झालें. या पुस्तकाचें अभिनंदन करणारांत पंडित कृष्णशास्त्री चिपळुणकर, माधवराव रानडे, विष्णुशास्त्री चिपळुणकर वगैरे बहुश्रुत रसिक विद्वान् होते. या सर्वांत अधिकाराच्या दृष्टीनें पाहतां कृष्णशास्त्र्यांच्या अभिप्रायाला अधिक महत्त्व असणार हें उघड आहे. विषयाची निवड, भाषेचें संप्रदायशुद्ध वळण व पात्रांचे भाषण-प्रसंग यांची शास्त्रीबोवांनीं आपल्या शालापत्रकांतील अभिप्रायांत प्रशंसा केली आहे. मात्र रामशास्त्री व माधवराव यांचीं राजकारणासंबंधाचीं भाषणें पाल्हाळीक व नाटकांत न शोभण्या-सारखीं आहेत; तीं वगळिलीं असतां नाटकाची हानि होत नाहीं असें त्यांनीं म्हटलें आहे. प्रस्तुत नाटक दुःखपर्यवसायी आणि म्हणून ट्राजिडी ( Tragedy ) आहे असें शास्त्रीबोवांनीं म्हटलें आहे तें मात्र चिंतनीय आहे. केवळ परिणामावरून एखादें नाटक आनंदसंवेदक ( Comedy ) किंवा शोकसंवेदक ( Tragedy ) आहे असें ठरवितां येत नाहीं. सगळें नाटक वाचून मनावर ज्या भावनेचा पगडा बसेल तिच्यावरून तें नाटक आनंदप्रधान किंवा शोकप्रधान मानतां येतें. माधवराव नाटकाचा शेवट जरी दुःखांत झाला आहे तरी त्या सर्व नाटकाचा एकंदरींत परिणाम शोकप्रधान नसल्यामुळें तें Tragedy होऊं शकत नाहीं. उलट, उत्तररामचरित्र नाटक जरी आनंदपर्यवसायी आहे तरी साकल्यानें त्याचा परिणाम शोकप्रधान असल्या-मुळें त्याला Comedy मानतां येत नाहीं. इंग्रजी विद्येच्या संस्कारानें त्या

भाषेतील नाट्यवाङ्मयाचा परिचय झाल्यावर Tragedy व Comedy हे शब्द आपणांस ठाऊक झाले व त्यांशीं समानार्थक म्हणून शोकपर्यवसायी व आनंदपर्यवसायी ही शब्दांची जोडी अस्तित्वांत आली. परंतु Tragedy व Comedy यांचें यथार्थ स्वरूप व्यक्त करण्यास ही समर्थ नाहीं. Tragedy या शब्दाला शोकप्रधान व Comedy या शब्दाला विनोद-प्रधान नाटक म्हणणें स्थूलमानानें योग्य होईल. माधवराव नाटक दुःखपर्यवसायी आहे. भारतीय नाट्यशास्त्राला दुःखपर्यवसान संमत नाहीं. विनायकरावांनीं रूढीचें व शास्त्राचें उल्लंघन करून ही गोष्ट केली हें पुष्कळांस साहसाचें वाटलें व त्यावेळच्या नाट्यरसिक मंडळींत या गोष्टीनें मोठी खळबळ उडवून दिली. तथापि शास्त्रीबोवांसारख्या परिणतप्रज्ञ जुन्या साहित्यपंडितानें या नव्या प्रकाराचें जाहीर अभिनंदन केलें! एवढेंच नव्हे तर शोकप्रधान नाटकें विनोदप्रधान नाटकांपेक्षां अधिक बोधप्रद कशीं व कां होतात याची उपपत्तिही त्यांनीं प्रस्तुत पुस्तकावरच्या अभिप्रायांत थोडक्यांत दिली आहे; ( शा. प. मे. १८६५ ). ती आजच्या साहित्य-पंडितांसही मान्य होण्यासारखी आहे. दुःखपर्यवसायी नाटकाचा हा पाश्चात्य प्रकार विनायकरावांनीं प्रथम अंमलांत आणिला या दृष्टीनें या कृतीला इंग्रजी वळण आहे असें धाकटे चिपळुणकर यांनीं म्हटलें असावें.

स्वतंत्र रचना, विषयाची निवड, वेंचक प्रसंगांची योजना, पात्रांचा स्वभाव-परिपोष, भाषेची प्रसन्नता व दुःखपर्यवसायित्वाची अपूर्वता या गोष्टी आमच्या मतें प्रस्तुत पुस्तकाचें महत्त्व स्थापित करितात.

विनायकरावांचा काल विशेषतः भाषांतराचा होता. तथापि त्यांच्या बुद्धीनें रचनास्वातंत्र्य प्रगट केलें. केवळ कथेपुरता त्यांनीं ऐतिहासिक भाग घेतला व त्यावर नाटकाची उभारणी केली. ही गोष्ट त्या काळीं नवी होती.

पेशव्यांमध्यें थोरले माधवरावसाहेब अत्यंत तेजस्वी, बाणेदार, पराक्रमी व शीलवान् होते. त्यांची कारकीर्द नाटकाला निवडून घेण्यांत विनायकरावांनीं चातुर्य दाखविलें आहे. कृष्णशास्त्री चिपळुणकर याविषयीं आपल्या अभिप्रायांत असा आशय दर्शवितात कीं, पेशव्यांच्या इतिहासांत या मानाला पात्र असा पुरुष थोरले माधवरावच; व मराठ्यांच्या इतिहासांत या गौरवाला योग्य

असणारी स्त्री एक अहल्याबाई होळकरच. या विधानांत पुष्कळ अर्थ आहे.

एखादी गोष्ट सबंध ठाऊक असली तरी तिच्यांतलीं नाट्योपयोगी वेंचक स्थळें निवडून काढण्याला एकप्रकारची रसिकता व कुशलता लागते. ती विनायकरावांनीं प्रगट केली आहे. थोरल्या माधवरावांच्या कारकीर्दीतील ठळक गोष्टींचा प्रस्तुत नाटकांत प्रामुख्यानें उल्लेख आहे.

माधवराव, रमाबाई, रामशास्त्री, सखारामबापू, त्र्यंबकरावमामा, रघुनाथरावदादा, आनंदीबाई व कांहीं सरदार यांचा स्वभाव यांत सुंदर रीतीनें चित्रिला आहे. हीं चित्रें रंगवितांना त्या त्या व्यक्तींचें ऐतिहासिक महत्त्व तंतोतंत कायम ठेविलें आहे.

नाटकाची भाषा सर्वत्र प्रसन्न व रमणीय आहे; व त्या त्या पात्राला साजेल अशी तिची योजना आहे. कृष्णशास्त्री यांच्या कालांत इंग्रजी शिकलेल्या विद्वानांची मराठी भाषा फार विकृत स्वरूपांत असे. विनायकराव इंग्रेजी विद्वान् असून त्यांची भाषा शुद्ध देशी वळणाची उतरली हें पाहून शास्त्रीबोवांस फार कौतुक वाटलें. म्हणून माधवराव नाटकाच्या भाषेबद्दल त्यांनीं विशेष आनंद प्रदर्शित केला.

हें नाटक दुःखपर्यवसायी रचलें गेलें ही गोष्ट नवीन होती हें वर आलेंच आहे. विनायकरावांचा विनोद उच्च दर्जाचा नाहीं. पण त्यांत अश्लीलपणा किंवा पानचटपणा नाहीं. या नाटकांत करुण, वीर व शृंगार यांचा यथोचित पोष झाला आहे.

माधवराव नाटकावरील हे विचार संपवितांना कित्येक आधुनिक ऐतिहासिक नाटकांशीं त्याची तुलना करण्याचा मोह आम्हांस होत आहे. तोतयाचें बंड, सवाईमाधवरावांचा मृत्यु व शिवपाविञ्य हीं तीन नाटकें माधवरावाशेजारीं ठेवून पाहूं. या सर्व नाटकांचे प्रणेते बहुश्रुत, लेखनपटु, सहृदय, रसिक व नाट्यरचनाकुशल विद्वान् आहेत. माधवराव नाटकांत जे गुण प्रगट झाले नाहींत ते सदरील नाटकांत दिसून येतात. भाऊसाहेबांचा तोतया इतिहासज्ञांस किंबहुना सामान्य समाजासही विश्रुत आहे. परंतु काव्याच्या दृष्टीनें त्याकडे पाहून त्यावेळचा करुणास्पद प्रसंग नाट्यरूपानें रंगभूमीवर कुशलतेनें आणण्याचें श्रेय

तोतंयाच्या बंडासच दिलें पाहिजे. सवाईमाधवरावांचा शोचनीय मृत्यु कोणास ठाऊक नाहीं ? परंतु इंग्रजी कविसार्वभौमाच्या लोकोत्तर प्रतिभेनें निर्मिलेल्या हॅमलेट व आयागो या पात्रांना 'सवाईमाधवरावांचा मृत्यु'–या नाटकांत कविकल्पनेनें मराठी अवतार घ्यावयास लाविलें आहे ! सवाई-माधवरावांच्या मृत्यूची मीमांसा व हॅमलेट व आयागो यांचें रूपांतरानें साम्यप्रदर्शन हेंच सवाईमाधवराव नाटकाचें मुख्य प्रयोजन आहे. आतां हॅमलेट व सवाईमाधवराव यांत साम्य किती व कोठें आहे, तसेंच आयागो व केशवशास्त्री यांत साधर्म्य किती व कोणतें आहे याचा बरोबर निर्णय करण्याचें काम हॅमलेट, आथेल्लो व सवाईमाधवराव यांचें परिशीलन करणाऱ्या रसज्ञ पंडितांचें आहे. आम्हांला येथें एवढेंच सांगावयाचें आहे कीं वरील पात्रांच्या साम्याची कल्पनाच अभिनव व म्हणूनच कुतूहलास्पद आहे. कल्याणच्या सुभेदाराची सून कल्याणच्या लुटींत सांपडली. ती आबाजी सोनदेव यांनीं छत्रपति शिवाजीराजे यांस नजर केली. परंतु नीतिमान् व जितेंद्रिय महाराजांनीं तिला मातेचा मान देऊन बहुमानपुरःसर तिच्या पतीकडे परत पाठविलें. ही लोकोत्तर गोष्ट शिवभक्त मोठ्या प्रेमानें किती वेळां तरी सांगतात व श्रोतेही नव्या आनंदानें ती किती वेळां तरी ऐकतात ! पण प्रस्तुत प्रसंगाला उज्ज्वल प्रतिभादुकूल नेसवून रसिकजनरंजन करण्याचें काम शिवपाविऱ्यानें प्रथम केलें. ऐतिहासिक प्रसंगावरील हीं नवीं नाटकें संविधानक-चमत्कृति, प्रतिभाविलास व सुश्लिष्ट वस्तुकल्पना या दृष्टीनें रसिकांस अधिक आदरणीय झालीं आहेत.

'जयपाळ' हें नाटक रूपांतरात्मक आहे; स्वतंत्र नाहीं. बायबलाच्या जुन्या करारांतील जॉबच्या कथानकाची ही छाया आहे असा रा. ब. महाजनींचा अभिप्राय आहे. रा. देव या नाटकासंबंधानें लिहितात, 'जयपाळ नाटकांत मातृवात्सल्य व पुत्रप्रेम या मनोवृत्तींचें अत्यंत मनोहर आणि हृदय-द्रावक चित्र प्रभावती, चंद्रकेतु, व जयपाळ यांच्या संभाषणांत उठलें आहे. तें वाचून मन तल्लीन होतें. हें चित्र काढणाऱ्या कुशल कारागिराच्या भाग्यीं तें सुख लाभलें नसतांना त्यांनीं तो अनुभव असा उठावांत चितारला हें त्यांच्या स्वभावपरिज्ञानाच्या सूक्ष्मत्वाचें व मार्मिकतेचें, तसेंच सहृदयतेचें द्योतक आहे.' हे उद्गार अयथार्थ नाहींत. विष्णुशास्त्री चिपळुणकर यांनीं भाषापद्धति या

निबंधांत जयपाळांतील निसर्गवर्णनाचा एक रम्य उतारा घेऊन ग्रंथकाराची प्रशंसा केली आहे. माधवराव नाटकाच्या तुलनेनें 'जयपाळ' कमी दर्ज्याचें उतरलें आहे असा रसिकांचा एकंदरींत अभिप्राय पडतो. माधवराव रानडे यांनीं १८९७ सालीं मराठी वाङ्मयाचा आढावा काढला. त्यांत नाटकांच्या सदरांत 'माधवराव' व 'जयपाळ' हीं नाटकें अग्रस्थानीं घालून त्यांची माधवरावांनीं योग्य संभावना केली आहे. शिवाय यापूर्वी इंदुप्रकाशांत लेख लिहून त्यांनीं या पुस्तकांचा योग्य परामर्ष घेतलेला आहे. आलीकडे रंगभूमीच्या चालकांनींही पुष्कळ उतारे देऊन या नाटकावर मोठा विस्तृत व फार अनुकूल अभिप्राय दिला आहे. मुंबई युनिव्हर्सिटीनें एम्. ए. च्या परीक्षेच्या मराठी अभ्यासक्रमांत जयपाळ नाटकाला स्थान देऊन आपली गुणग्राहकता दर्शविली ही संतोषाची गोष्ट आहे. मुंबई युनिव्हर्सिटीनें या ग्रंथाची ही केलेली संभावना अस्थानीं आहे असें कित्येक विद्वानांस वाटतें. त्यांच्या मतें त्यांत प्रौढ विद्यार्थ्यांनीं शिकण्यासारखें कांहीं नाहीं. परंतु युनिव्हर्सिटीनें हें पुस्तक, उदात्त व गहन विचार किंवा अपूर्व कल्पना त्यांत आहेत म्हणून नेमिले असें नव्हे, तर ज्या वेळेला इंग्रजी भाषा शिरजोर होऊन मराठीवर करडा अंमल गाजवूं लागली त्या काळांत मराठीची अब्रू राखणारा, तसेंच हल्लींच्या कित्येक नाटकांतील बाष्कळपणा व अश्लीलपणा यापासून अगदीं अलिप्त असलेला व सन्मार्गबोधक असा जुना नमुनेदार ग्रंथ म्हणून युनिव्हर्सिटीनें त्याचा आदर केला असावा असें आम्हांस वाटतें. बालबोध 'आनंदगीतें;' अत्यंत अव्यवस्थितपणें, अपूर्णपणें व अशुद्धपणें संपादिलेली 'काव्यकौमुदी;' नीरस, बोजड, पुष्कळ ठिकाणीं संदिग्ध तात्पर्याचा व चुटकेवजा 'मननामोद;' असले ग्रंथ उच्चतम पदवीच्या परीक्षेचा अभ्यास करणाऱ्या प्रौढवयस्क, चिकित्सक, व विचारक्षम विद्यार्थ्यांना शिकावयाची पाळी यावी ही मात्र खेदाची गोष्ट आहे! अस्तु. टाइम्स ऑफ इंडिया दैनिकानें विनायकरावांवरील निधन-लेखांत त्यांच्या नाटकरूप वाङ्मयसेवेचीच विशेष प्रशंसा केली आहे. अशी मार्मिक टीका करणारा कोणी तरी मराठी पंडित असला पाहिजे. पूर्वोक्त नाटकांशिवाय 'मध्यहिंदुस्थानचा इतिहास' व दुसरे कांहीं मराठी लेख विनायकरावांनीं लिहिले. परंतु ते त्यांस विशेष प्रतिष्ठावह नाहींत. येथपर्यंत विनायकरावांच्या पूर्वचरित्रांतील कामगिरीच्या स्वरूपाचें थोडेसें आविष्करण झालें. आतां आपण

त्यांच्या उत्तरचरित्रांतील कर्तृत्वाचें थोडेसें पर्यालोचन करूं या.

सर टी माधवराव इ. स. १८७३ मध्यें इंदुरास दिवाण होऊन आले. यांच्या आगमनामध्यें विनायकरावांच्या भावी अभ्युदयाचें बीज आहे. राजगुरुत्वाच्या अखेरीपर्यंत विनायकरावांचा सरस्वतीच्या उज्ज्वल प्रासादांत स्वच्छंद सुखसंचार होता. सात्त्विक व निर्मळ आनंदाचा ते यथेच्छ उपभोग घेत होते. यापुढें राजलक्ष्मीच्या राजस विलासमंदिरांत त्यांचा प्रवेश होण्याचा योग आला. त्यामुळें त्यांच्या ऐहिक भाग्याची परिसीमा झाली ही गोष्ट खरी आहे; तथापि एकान्त शारदोपासना व तिच्यापासून होणारा अनिर्वचनीय आनंद यांस ते कायमचे मुकले! सर टी माधवराव मोठे मुत्सद्दी म्हणून नांवाजलेले होते. त्यांना माणसाची पारख उत्तम होती. अनुभविक व नजरबाज सराफ ज्याप्रमाणें काचखंडपुंजांत चुकून पडलेला तेजस्वी हिरा चटकन् निवडून काढतो त्याप्रमाणें माधवरावांनीं इंदूरच्या अधिकारिवर्गांतून एकदम विनायकरावांस वेंचून काढलें, व त्यांस हाताशीं धरून प्रथम न्यायखात्यांत व पुढें राजकीय खात्यांतही प्रविष्ट केलें. अनभ्यस्त असतांही हीं नवीं कामें विनायकरावांनीं चोख रीतीनें पार पाडलीं. यामुळें दिवाणसाहेबांचा विनायकरावांवर विशेष लोभ जडला. परंतु ही गोष्ट त्यावेळचे इंदूराधिपति श्रीमंत तुकोजीराव यांस मानवली नाहीं. त्यांना विनायकराव आपल्या कक्षेंत व तंत्रांत हवे होते. पण विनायकरावांच्या स्वतंत्र बुद्धीला पायबंद नको होता. यामुळें श्री. तुकोजीरावांच्या मनांतून विनायकराव दिवसेंदिवस उतरत चालले; व याचा कटु अनुभवही विनायकरावांस प्रत्यहीं येत चालला. पुढें दोन वर्षांनीं म्हणजे १८७५ सालीं सर टी माधवराव बडोद्यास दिवाण होऊन गेले. तेथून त्यांनीं विनायकरावांना बडोद्यास पाचारण केलें. इंदोरच्या महाराजांशीं आपलें जुळणें कठीण असें वाटून विनायकराव इंदूर सोडून बडोद्यास गेले. तेथें माधवरावांच्या हाताखालीं ते क्रमाक्रमानें १५०० रुपयांवर नायब दिवाण झाले. विनायकरावांकडे खाजगी, पोलीस, शिक्षण, न्याय वगैरे अनेक खातीं होतीं व त्यांनीं तत्संबंधीं आपलें काम योग्य रीतीनें बजावलें. श्री. सयाजीराव व माधवराव हे उभयतां विनायकरावांवर प्रसन्न होते. गृहस्थाश्रमाचें खरें सौख्य विनायकरावांस साऱ्या जन्मांत येथेंच पूर्णपणें अनुभवाला मिळालें.

यदि रामा यदिच रमा यदि तनयो विनयधीगुणोपेतः ।
तनये तनयोत्पत्तिः सुरवरनगरे किमाधिक्यम् ? ॥

या भर्तृहरीच्या उक्तीची सार्थकता विनायकरावजींच्या संसारांत दिसत होती. अशा आनंदाच्या भरांत, 'I wonder at my fortune!' असा उद्गार त्यांच्या मुखावाटे निघत असे! पुढें श्री. सयाजीरावांनीं राज्यसूत्रें हातांत घेतलीं तेव्हां सर टी. माधवराव दिवाणगिरी सोडून गेले. यावेळीं महाराजांनी दिवाणाचीं वस्त्रें विनायकरावांस देऊं केलीं. परंतु काजी शाबुद्दीन यांचा दिवाणगिरीवर हक्क आहे तो बाजूला सारून दिवाणगिरी पतकरणें मला ठीक वाटत नाहीं असें विनायकरावांनीं महाराजांस कळविलें! तेव्हां महाराजांनीं काजी शाबुद्दीन यांस दिवाण नेमिलें. विनायकरावांनीं अशा रीतीनें मनाचा थोरपणा दाखविला. पण काजी शाबुद्दीन यांच्या पश्चात् दिवाणगिरीचा मान श्री. सयाजीरावांनीं विनायकरावांस दिला नाहीं. यामुळें विनायकरावांस साहजिकच मोठा अपमान वाटला व त्यांनीं आपल्या नायब दिवाणगिरीचा एकदम राजिनामा देऊन पुण्याकडे प्रयाण केलें! नवीन दिवाणाशीं कांहीं एक संबंध नसणारी पंचवीसशे रुपये दरमहाची एक स्वतंत्र नवीन जागा तुम्हांस देतों असें सांगून विनायकरावांची समजूत घालण्याचा श्रीमंतानीं प्रयत्न करून पाहिला, पण तो व्यर्थ गेला! पुणें येथें असतां इंदूर व बडोदें येथून एकंदर ३५० रुपये पेनशनादाखल विनायकरावांस मिळूं लागले. तथापि पहिल्या प्रतीच्या संस्थानाची दिवाणगिरी करण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा बलवत्तर होती. ती त्यांस चैन पडूं देईना. कै. नूलकरांसारखें सार्वजनिक काम करून लौकिक संपादन करण्याची त्यांस आतां चांगली संधि होती. 'मराठा'—पत्रानें तशा प्रकारची सूचनाही रावबहादुरांस केली होती. पण वर सांगितल्याप्रमाणें विनायकरावांच्या मनाची स्थिति असल्यामुळें सार्वजनिक काम करण्याकडे त्यांचें मन वळलें नाहीं. ग्वालेरची दिवाणगिरी संपादन करण्याचा त्यांनीं यत्न केला पण तो विफल झाला. पण पुढें लवकरच, पहिल्या प्रतीच्या संस्थानाचा मुख्य दिवाण होण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा अगदीं अकल्पित रीतीनें सहज सफल झाली. इ. स. १८८६ मध्यें विनायकरावांचे शिष्य युवराज श्रीमंत शिवाजीमहाराज इंदोरच्या गादीवर बसले. त्यांनीं

ताबडतोब आपल्या गुरुवर्यांना पुण्याहून बोलावून आणिलें व बहुमानपुरःसर त्यांस मुख्य दिवाणगिरीचीं वस्त्रें दिलीं. याप्रमाणें विनायकरावांनीं आपल्या महत्त्वाकांक्षेचें शिखर गांठलें. यामुळें त्यांस तात्पुरतें समाधानही वाटलें. मुख्य दिवाणगिरीचें पद, दोन हजार रुपये पगार, सर्व खात्यांवर पूर्ण अखत्यारी अशी सर्व बाजूंनीं वैभवाची लोभनीय स्थिति प्राप्त झाली तरी बडोद्याचे नायब दिवाण असतांही जें सुख व जो आनंद त्यांस लाभला तें सुख व तो आनंद आतां त्यांस स्वप्नांतही अनुभवाला मिळेना! राजकारणांतल्या धकाधकीनें त्यांस अस्वस्थता वाटूं लागली, व दिवाणगिरी पतकरल्याचा अनुताप होऊं लागला! उत्तरोत्तर बिकट परिस्थिति प्राप्त होऊं लागली. तथापि कांहीं काल मोठ्या धैर्यानें व निश्चयानें त्यांनीं संकटपरंपरेला तोंड दिलें. सरदार बुळेप्रकरण, रंगरावाचा मुकदमा, तंट्याभिल्लाचा उपद्रव, धाडेती बोंद्र्याची धामधूम, व खाजगी-विषयींचा कलह अशीं महत्त्वाचीं व गुंतागुंतीचीं कामें विनायकरावांनीं मोठ्या कुशलतेनें पार पाडलीं. शेवटीं निरंकुश दुराराध्य राजसत्ता व स्वतंत्र न्यायनिष्ठा यांच्यांत झटपट उडाली व तिच्यांत स्वतंत्र न्यायनिष्ठा नामोहरम झाली! कापशे-प्रकरणाचा धूमकेतु इंदोरच्या क्षितिजावर एकाएकीं झळकूं लागला! हा अधःपातसूचक अपशकुन झाल्याबरोबर विनायकरावांनीं दिवाणाचें पद सोडलें व पुण्याचा रस्ता धरला! विनायकरावांस हें पतन यशापेक्षांही भूषणास्पद आहे असें रा. देव म्हणतात तें, 'खंडिता एव शोभन्ते वीराधरपयोधराः' या रसिकोक्तीप्रमाणें खरें आहे. बेलगाम राजसत्तेपुढें विनायकरावांनीं मान वांकविली नाहीं यांत खरा विजय त्यांचाच आहे. 'नृपांगणगत खल' भर्तृहरीला शल्यासारखा कां बोंचत होता याचें रहस्य विनायकरावांच्या मनावर चांगलें बिंबलें व 'वारांगनेव नृपनीतिरनेकरूपा' या कव्युक्तीचा प्रत्ययही त्यांस पूर्णपणें आला. पुण्यांत येऊन राहिल्यावरही त्यांच्या मनाला स्वस्थता नव्हती. तशांत शरीरांत पुष्कळ दिवस बिऱ्हाड करून राहिलेला मधुमेह विकार बळावला व त्यामध्येंच त्यांची १८९१ सालीं इहलोकींची यात्रा संपली!

याप्रमाणें अध्यापक, विद्याधिकारी, नाटककार, न्यायाधीश व दिवाण या पांचही अवस्था रा. ब. कीर्तने यांनीं अनुभविल्या. यांपैकीं कोणत्याही अवस्थेंतलें काम उत्कृष्टपणे करण्याची आपली लायकी त्यांनीं सिद्ध करून दाखविली. एकाच भूमिकेवर ते चिरकाल स्थिर झाले असते तर तिच्यांत त्यांचा परमो-

त्कर्ष दिसून आला असता. पण तसें व्हावें असा ईश्वरी संकेत नव्हता. नाटककार व दिवाण या नात्यानें त्यांनीं यश व लक्ष्मी संपादन करून कीर्तनेकुल उज्ज्वल केलें. बुद्धिमान् महाराष्ट्र-ब्राह्मण योग्य अवसर मिळाल्यास केवढी कर्तबगारी करून दाखवितो याचें रा. ब. कीर्तने हे आधुनिक काळांतलें उत्तम उदाहरण होत.

प्रस्तुत ग्रंथसंग्रहांतील तिसरा ग्रंथ रा. देव यांनीं लिहिलेलें रा. ब. कीर्तने यांचें चरित्र होय. या विषयीं थोडेसें लिहून ही प्रस्तावना पुरी करावयाची आहे. चरित्रविषयीभूत व्यक्तीविषयीं प्रेम व आदर, तिच्या संबंधाची विश्वसनीय व विपुल माहिती, चरित्र लिहिण्याची कला व सत्याविषयींचा पक्षपात अशी चतुर्विध सामग्री चरित्रकाराला आवश्यक असते. रा. देव यांस तिची पुष्कळच अनुकूलता असल्यामुळें त्यानीं लिहिलेलें कीर्तने-चरित्र फार चांगलें उतरलें आहे. त्यांनीं चरित्रनायकाचा सर्वांगीण परामर्ष घेतला आहे. चरित्रांत विविध प्रसंग आले असून त्यांवर चरित्रलेखकांनीं प्रांजल अभिप्राय दिले आहेत. कथाप्रसंगानें कुंटे व आनंदाचार्लू यांचीं शब्दचित्रें सुंदर रीतीनें रेखाटलीं आहेत. यांत कांहीं स्थळें अशीं नाजूक आहेत कीं त्यांविषयीं निर्भीडपणें निर्णायक असें कांहीं लिहिणें फार कठीण होतें. बाटल्यांवर खुर्ची ठेऊन तिच्यावर कसरत करणें देखील त्यापेक्षां सोपें असें आम्हांस वाटतें. आम्हीं चरित्रनायकांच्या मुख्य कर्तबगारीचा वरतीं उल्लेख केला आहे. पण तिच्या शिवायही चरित्रनायकाचीं अनेक लहान लहान कर्तव्यक्षेत्रें होतीं. त्यांचा चरित्रकारानें साकल्यानें विचार केला आहे. ती हकीकत रा. देवांनीं लिहिलेल्या चरित्रावरून वाचकांनीं अवश्य वाचावी म्हणजे चरित्रनायकाच्या विषयीं त्यांना सर्व बाजूंनीं योग्य कल्पना येईल. चरित्राच्या आरंभीं महापुरुष-चरित्र-लेखनाविषयींच्या महाराष्ट्रांतील औदासीन्यासंबंधानें रा. देवानीं थोडासा खेद प्रदर्शित केला आहे. परंतु रा. देवांच्या कीर्तने-चरित्रानंतर रानडे, टिळक, मंडलीक, गोखले, भांडारकर यांचीं चरित्रें व दादोबा पांडुरंग व कर्वे यांचीं आत्मचरित्रें यांनीं मराठी वाङ्मयाच्या चरित्राचें दालन संपन्न होत चाललें आहे असें पाहून रा. देव यांस संतोष वाटेल. माधवराव पेशवे व जयपाळ या नाटकांबरोबर रा. देवलिखित कीर्तनेचरित्र छापलें गेलें हें दोन प्रकारांनीं योग्य झालें. एक तर माधवराव व जयपाळ यांचा अभ्यास करणाराला त्या

नाटकांच्या कार्याचा या चरित्रामुळें अगदीं अनायासें माहिती होईल; व दुसरें असें कीं या निमित्तानें पुनर्मुद्रित झालेल्या कीर्तनेचरित्राला अधिक प्रसिद्धि मिळेल व अशा रीतीनें आपल्या श्रमाचें थोडेंबहुत चीज झालें असें समाधानही रा. देवांस वाटेल. प्रस्तुत चरित्राबद्दल रा. देव यांचें प्रेमपूर्वक अभिनंदन करून व या ग्रंथसंग्रहाचा स्वीकार करावा अशी महाराष्ट्र-रसिक-वाचकांस सप्रेम विनंति करून हा अल्प प्रस्तावनालेख आम्ही आटोपता घेतों.

न्यू पूना कॉलेज, पुणें.
डिसेंबर, १९२७.

**लक्ष्मणशास्त्री लेले.**
( प्रोफेसर, न्यू पूना कॉलेज. )

# थोरले माधवराव पेशवे

## नांदी

सर्व ब्रह्मांडाच्या उत्पत्तिस्थितिलयांस हेतु जो सच्चिदानंद तो आपलें संरक्षण करो, व मला बुद्धि देओ.

## अंक १ ला

### प्रवेश १

**विदूषक**–अरे सूत्रधारा, आज तूं हा कशाचा खटाटोप मांडला आहेस रे? हे लोक काय कारण योजून येथें आले आहेत?

**सूत्रधार**–तुला कांहीं एक वार्ता देखील ठाऊक नाहीं, अं! तर मग तूं रे काय कारण योजून आलास?

**विदूषक**–मी, मी? तूं मला सांगितलेंस कीं, विदूषका, प्रयोजन आहे, चल; म्हणून मी आपला गरीब ब्राह्मण आजचा दिवस तरी तूपपोळी चळचळीत मिळेल अशा बेतानें काखेस सोवळेंभांडें मारून आलों. आणखी सूत्रधारा, हा माझा मुलगाही मीं आणिला आहे, पाहा. दुप्पट दक्षिणेचें संधान!

**सूत्रधार**–विदूषका, तूं तर अकलेचा पूर्ण सागर दिसतोस, गड्या!

**विदूषक**–तो कसा रे?

**सूत्रधार**–कसा रे! अरे, मीं काय तुला सांगितलें? मी म्हणालों–विदूषका, तुझें कांहीं प्रयोजन आहे, चल.

**विदूषक**—मग मी काय बोललों? तुला प्रयोजन आहे म्हणजे मेजवानी आहे, चल.

**सूत्रधार**—पुनः आपलेंच! अरे, तुला प्रयोजन नव्हे, तुझें प्रयोजन आहे, चल. प्रयोजन म्हणजे कारण.

**विदूषक**—हं, हं; आतां उमजलों. माझें कारण आहे काय? मग बरें आहे. काय म्हणतोस?

**सूत्रधार**—माझें साहित्य कर.

**विदूषक**—मी असा तुझ्यासारिखा दुतोंड्या नाहीं. प्रयोजन नाहीं म्हणतोस, आणि साहित्य तर कर म्हणतोस. तुझें खरें काय समजावें? मी आपला निघून जातों कसा. नाहीं तर एक काय तें सांग.

**सूत्रधार**—साहित्य म्हणजे पापड, सांडगे, लाडू हें नव्हे, बाबा. साहित्य कर म्हणजे मदत कर. आज माझ्या दैवानें विदूषक तर मला फार विद्वान् मिळाला आहे!

**विदूषक**—असें काय! तें काम माझें. तूं आतां काय करणार तें सांग म्हणजे त्यासारखी मदत.

**सूत्रधार**—ऐक तर, सांगतों. हे श्रोतेहो, तुम्हीही ऐका. विदूषका, आज मी या लोकांना मराठी दरबारांत नेऊन तेथील हालहवाल दाखविणार. तें कोणतें मराठी दरबार जर म्हणशील तर बाबा, आतांचें नव्हे. ज्या दरबारांत परद्वीपस्थ लोकांच्या आज्ञा चालतात, व राजे केवळ पिंजऱ्यांतील पोपटाप्रमाणें असून स्वसत्तेच्या छायेस देखील ओळखीत नाहींत, अशा ठिकाणीं मी यांना कशाला नेऊं? तर थोरले श्रीमंत माधवराव साहेब पेशवे, कीं ज्यांनीं प्रजेचें पोटच्या

पुत्राप्रमाणें प्रतिपालन केलें, ज्यांचें नांव ऐकिलें असतां मुसलमानांनीं थरथरां कांपावें, व ज्यांच्या वियोगेंकरून सर्व महाराष्ट्रदेश उदासीन होऊन निस्तेज झाला आहे त्या सत्पुरुषाच्या दरबारीं यांस नेतों, आणि तेथील चमत्कार दाखवितों.

**विदूषक**—सूत्रधारा, अशी स्तुति करण्याची तुझी चालच आहे. पण यांना तूं मराठी दरबार कां दाखवितोस हे मी समजलों. अरे, चोराच्या वाटा चोरालाच ठाऊक. तुझ्या मनांत मराठी राज्यांत यांस नेलें म्हणजे दाद ना फिर्याद ! सर्व बुचाडून घेऊन अलख गोसावी करून परत पाठविण्यास चिंता नाहीं ! पाहाहो, बाबांनों ! तुमच्या मनांतून धडपणें घरीं निघून जावयाचें असेल तर आपले चालते व्हा. नाहीं तर पेढाऱ्यांचे बडगे आले म्हणून समजाच ! कां सूत्रधारा, होय कीं नाहीं, बोल.

**सूत्रधार**—तुझें बोडकें बोल आतां ! कोणत्या नक्षत्रावर जन्मला कोण जाणे हा राजहंस ! शेणाचा दिवा ओंवाळा ! कोठें बाप तपश्चर्या करीत बसला होता, तें हें रत्न पोटीं आलें ! लोकांना या या म्हणून सांगावें, तो हा शहाणा जा जा म्हणून सांगतो ! हेंच साहित्य करणार काय रे ?

**विदूषक**—सूत्रधाराला राग आला. बरें बाबा, जा जा नाहीं, या या म्हणतों. या हो या, आमचा सूत्रधार तुम्हांला मराठी दरबारांत नेऊन लुटणार ! या हो या ! तुमचीं पागोटीं द्या हो द्या ! आमचा सूत्रधार तुम्हांला नेऊन लुटणार ! या हो या ! झालें आतां ?

**सूत्रधार**—झालें म्हणजे ? असा दिवटा साह्यकारी असल्यावर

होणार नाहीं काय ? पण विदूषका, मराठी राज्य केवळ लुटारू होतें असें तूं समजूं नको. तुझ्यासारख्या शहाण्याची मात्र ही समजूत ! माधवरावाच्या राज्यांत कसें होतें तें आतांच दिसून येईल. तूं घटकाभर स्वस्थ जर असशील तर सर्व चमत्कार दृष्टीस पडतील. (श्रोत्यांस पुनः ) हे श्रोतेहो, आतां तयार व्हा; कंबरा बांधा, वायूपेक्षांही जलद वेग देऊन तुमचीं हीं दृश्य जडें येथेंच जों बसलीं आहेत तोंच तुम्हांस सातार्‍यास नेऊन, तेथून पुण्यास आणून, दाखवायाचें तें दाखवून, पुनः येथें सोडितों !

( पडदा पडतो; सूत्रधार व विदूषक निघून जातात. )

---

## प्रवेश २

सातारा—राजवाड्यांत दिवाणखान्याबाहेरील जागा

### सदोबा भालदार व गणोबा चोपदार

**सदोबा**—रामराम, गनबा.

**गणोबा**—रामराम, रामराम, सदबा रामराम. कां सदबा, भोजन बिजन करूनशेनी आलां कीं न्हाइव ?

**सदोबा**—त्ये कशाला, गनबा पुसावन्? आज सरकारकचेरी हाय ना. ह्योच सरकार सवारीची आज्ञा घेऊनशेनी ग्येलो तो. आन बगा बायकोन काइ भाकर काइ कोरड्यास ठ्येवलन त्ये बिगिबिगिशी झटदिनी घेतल, अन् बगा भोजन बिगियान आटपुन डोईवर

मुंडासच ठ्येवल बगा, अन् आलों, ह्योच बगा तुमची गाट पडली बगा.

**गणोबा**—आपुनबी तसच बगा. काय म्हनत्यात न्हाई परसादिन जिन. आज पुन्यासल मुकत्यार आल्यात म्हनुनशेनी इतका थाट केलाया. आपल्या बगन्यांत येकुन असा थाट न्हवताच बगा.

**सदोबा**—अव त्ये काय राव म्हनता तुमी ! तालिवार त्ये तालिवार. तुका म्हन उगी ऱ्हाव अन् ज्ये ज्ये व्हइल त्ये त्ये पाव. आतां गनबा, तुमी कुनिकड चालला ?

**गणोबा**—सरकार स्वारीच सुक होऊनशेनी पोषाक चाललाया म्हनुन दिवानखान्यांत सर्व्यास्नी वर्दी द्याया चालली. तयारी आगदि मजी आगदि झालिया. आतां सवारी भाइर येइल. तुमीबी चला चनी. अन् काय ?

**सदोबा**—आपुन त तयारच हावोत. हा निगालो बगा, रामराम.

**गणोबा**—रामराम.

( दोघे निघून जातात. )

( पडद्यापलीकडे शब्द होतो. )

---

# प्रवेश ३

रामराज महाराज छतरपति हिंदुपत बादशाहा, खडी ताजीम. नजर रखो, महाराज !

( रामराजा सिंहासनावर जाऊन बसतो, नंतर मुजरे होतात. )

भालदार चोपदार पुकारतात ( महाराज छतरपति. )— } रघुनाथराव माधवराव पेशवे पंत प्रधान.

प्रतिनिधि, अमात्य, सचिव, हिंमतबहादर, सरलश्कर, निंबाळकर, घाटगे, मोहिते, खडी ताजीम महाराज!

( सर्व बसल्यानंतर )

**रघुनाथराव**—सरकारपायांवर घालण्यासाठीं नानासाहेबांचे चिरंजीव माधवराव आणिले आहेत. आजपर्यंत त्यांचा सरकारांनीं परामर्ष घेतला तसाच यांचाही घेणें होतच आहे. अर्ज मिळोन इतकाच.

**रामराजा**—( माधवरावाकडे बोट दाखवून ) नानासाबाचे च्यरंजीव? तोंड त लइ सारकं. जनु त्येच नांव ?

**माधवराव**—सरकार, मला माधव म्हणतात.

**पंतअमात्य**—प्रकृति सौम्य, व माधवराव साहेबांच्या आंगीं लीनता आणि साधेपणा फार.

**रघुनाथराव**—हुशारीहि तशीच आहे.

**निंबाळकर**—दादासाब, माशाच पिल्हु. पव्हायला शिकवन नग. सिंवाच्या बच्च्यास्नी हात्ती दावाया न्हाइ लागत.

**रामराजा**—व्हय, अन्, कां दादा, ( रघुनाथरावास ) नानासाब बी लइ चांगला परानी ! सावध, शाना, अन्, राजकारनी. त्येन बगा योका कामाला शंबर युक्ति लडवून पाव्या !

**रघुनाथराव**—जी, सरकारच्या ध्यानांत असलें म्हणजे झालें.

**रामराजा**—कां माधवराव, आतां तुमी आमच कारबारी, तुमच्या तिर्थरुपाच आमास्नी इस्मरन पाडा, मजी झाल.

**माधवराव**—जी, सरकारपायांची कृपा असली म्हणजे—हो, आमचा सेवकधर्म, चाकरी घेणें पायांकडे आहे.

**सचिव**—ठीक. (हिम्मतबहाद्दरास) कां उत्तर कसें योग्य आहे, पाहिलें ना?

**हिम्मतबहाद्दर**—त्ये काय? सरकारच इचारनबी लइ गोड; अनि उत्तरबी लइ गोड!

**रामराजा**—खजिन्यावरच कामगार कुट हायता? आन अटरा कारखान्यावरच बी?

कामगार दोहींकडील } आज्ञा, हजर सरकार! वस्त्रांची तयारी आहे, सर्व गोष्टींची तयारी आहे, महाराज!

**रामराजा**—आना, त, वस्त्र.

**खजिनदार**—आज्ञा महाराज. (वस्त्रें आणून देतो.)

**रामराजा**—या माधवराव, घ्या.

**रघुनाथराव**—व्हा, व्हा, पुढें व्हा.

**रामराजा**—(वस्त्रें दिल्यानंतर) आतां नीट खबरदारीन कारबार करा. नानासाबाचं आमासनी लइ दुक झाल, अपरंपार. पन तुमास्नी पाऊन आता संतोस झाला. त्यो बगा हिम्मतभादर, मला मद्दा दुःकाचा दीस ग्येला.

**हिम्मतबहाद्दर**—काय सांगु सरकार! अन् मी सूर्येनारायनाला अरग्य द्येत होतों. अन् पुकारा झाला नानासाब ग्येल्याचा. अन् सरकार, झाला र झाला घात म्हटल न, आरग्या गळाला! अन् त्योच

सरकारदर्शनाला बातमी घ्येवी म्हनुनशेनी आलों. त्यो परसंग काय! आता ठीक झाल.

**तासांवरील**—अकराव्याचा अंबल हाय. घडी भरत आली, महाराज!

(पानसुपारी वांटितात आणि नंतर कचेरी बरखास्त होते.)

---

## प्रवेश ४

### सूत्रधार व विदूषक

**वि०**—काय रे सूत्रधारा, कशाची रे कचेरी ही! विडे वांटणारानें मला वेलदोडे बिलदोडे कांहीं दिले नाहींत. अशी कोठें चाल असते?

**सू०**—अरे, मग मागायाचे होतेस कीं नाहीं?

**वि०**—अरे, तो कोठला खडतर म्हातारा वांटणारा होता; तो लवंगा देखील देईना!

**सू०**—लवंगा तरी तूं मागितल्यास?

**वि०**—मागितल्या म्हणजे! तुझ्या मनांत राहतों कीं काय? पण तो कसला खाट! मला म्हणाला थांब. लंवगांबद्दल तुझ्या घशांत मिर्च्यांची पूड कोंदायास आणितों! नाहीं तर नाहीं, पण हा विदूषकराजाचा मान काय रे! थुः! थुः! थुः! त्या कचेरीच्या तोंडावर थुः! त्या म्हातारड्याच्या तोंडावर थुः!

**सू०**—अहो विदूषकराजे, रागावूं नका. पुण्यास तर तुम्ही चला. तुमची चंगाळी देतों उडवून! तेथें माझी ओळख आहे, पशानें वेलदोडे तुझ्या तोंडांत भरतों! चल तर खरा.

**वि०**—लुच्चा आहेस तूं ! त्या म्हातारड्याचा बाप तूं ! गुलामा कोल्ह्या, वेलदोडे मात्र खाशील तूं आणि सालपटें तेवढीं माझ्या घशांत कोंदशील !

**सू०**—नाहीं रे, त्याची कां तुला काळजी ?

**वि०**—कां काळजी ! माझ्या घशाची मला नको काळजी, तर का तूं बाळगशील ?

**सू०**—पुरे रे बाबा, तुझी बडबड ! सोलून दाणे दाणे तुझ्या घशांत घालीन. उमजलास ?

**वि०**—मग चिंता नाहीं; मग चल तर; आतां कोतवालघोड्या-सारिखा नाचत येतों. चल. ( दोघे निघून जातात. )

**पहिला अंक समाप्त.**

# अंक २ रा

## प्रवेश १

पुणें—शनवारवाड्यांतील कचेरी

**रामाजीपंत व चिंतोपंत** ( दोघे कारकून )

**रामाजी०**—कां चिंतोपंत, श्रीमंतांची स्वारी कोणीकडे आहे? तुम्ही अगदीं जवळ असणारे लोक म्हणून विचारतों.

**चिंतो०**—जवळ असणारे, अगदीं जवळ असणारे खरे. श्रीमंत कांहीं राजकारणी बेतांत गुंतले आहेत. तेथेंच रघुनाथरावदादा, सखाराम बापू, त्रिंबकमामा, रामशास्त्रीबावा, आणखी कांहीं जड पारडीं बसलीं आहेत.

**रामाजी०**—मामा! त्रिंबकराव मामा! अहो, ते दक्षिणेंत गेले होते ना? दोन चार दिवसांपूर्वी आले वाटतें. ऐकत होतों, तिकडून खंडणी घेऊन येतात म्हणून. बाळाजीपंत म्हणत होते. एकूण मामांची स्वारी आली अँ? ही मंडळी बसून किती वेळ झाला?

**चिंतो०**—झाला, तास एक होत आला. काय सांगूं? श्रीमंतांची कामाविषयीं दक्षता, शहाणपण आणि जलदी हीं कांहीं कोणाला साधायाचीं नाहींत! अल्पवयांत असे गुण असणें फार विरळा. पण जाऊं द्या. मला कांहीं कामासाठीं जावयाचें आहे तेव्हां लवकर गेलें पाहिजे. ( निघून जातो. )

# प्रवेश २

## माधवराव साहेब पेशवे, रघुनाथराव दादा, त्रिंबकमामा, रामशास्त्रीबावा, सखारामपंत, आणखी कोणीकोणी मंडळी

**रघुनाथराव**—मामा, माझी मीं सल्ला दिली. बोला, आतां परचक्र तर अगदीं नजीक येऊन ठेपलें. काय आंगावर तुटून पडावें, कीं आपण आपल्या गोटांतच लपून असावें ? कसें करावें ? मला तर बेलाशक आंगावर तुटून पडावें असें वाटतें.

**त्रिंबकमामा**—दादा, मला असें वाटतें. आपण होऊन—ऐकून घ्या,—आपण होऊन निजामअल्लीच्या आंगावर जाण्याच्या खटपटींत पडूं नये. आपल्या गोटांत मात्र तयारी कडेकोट ठेवावी. तो जवळ आला म्हणून चिंता नाहीं, आणि त्याहीपेक्षां, हीं आपलीं लष्करें थकून आलीं आहेत. तूर्त आपला कमजोर आहे, तेव्हां सोईची गोष्ट करून त्याची समजूत पाडावी हें बरें. आतां मजकडून म्हणाल तर लढाईला एव्हां याक्षणीं सिद्धता आहे; परंतु उत्तम पक्ष हा दिसतो. यावर श्रीमंत काय म्हणतात तें समजण्यांत आलें पाहिजे.

**रघुनाथ०**—छेः छेः छे, हा अगदीं भिकार सल्ला! यांत कांहीं अर्थ नाहीं. मार जाऊन कधीं पाहिली होती कीं नव्हती, अशी खोडकी जिरवावी त्या यवनाची! मामा म्हणतात अशांत भागूबाईपणा येतो. समरांगण गांठण्यासारखी मौज नाहीं! असेंही करितां जरी पराजय झाला तरी भागूबाईपेक्षां बरें! कां रामशास्त्रीबावा ?

**रामशास्त्री**—आपणा उभयतांच्या बोलण्यावरून असें अनुमान होतें कीं, वर्तमानकालीं स्वकीय सैन्याचा गौण पक्ष आहे. अतएव युद्धसंग्राम न करितां या व्यतिरिक्त अन्योपायाची योजना करून पर-चक्राचें निवारण करावें हें उचित दिसतें. तस्मात् मामा जें म्हणतात त्यास माझें अनुमोदन आहे. आतां यावर श्रीमंतांची काय आज्ञा होणें ती होईल.

**माधवराव**—दादा, मामा व शास्त्रीबावा यांनीं अनुक्रमानें आपापलें म्हणणें कळविलें. सखारामपंत, आतां तुम्हीं आपलें कळवा म्हणजे झालें.

**सखारामपंत**—माझा कांहीं निराळा अर्ज नाहीं. दोन्हीही युक्ति आहेत.

**राम०**—सखारामपंत, असें बोलण्याची ही वेळ नव्हे.

**त्रिंबक०**—दादांचा विचार माझ्या तर पसंतीस मुळींच येत नाहीं. कांहीं करणें तरी प्रसंग पाहून करणें, हा प्रशस्त मार्ग आहे. राज्य-कारभारांत युक्तिप्रयुक्ति सर्व ठिकाणीं जोडल्या पाहिजेत. केवळ धर कीं झोडप, मारीन किंवा मरेन असें म्हटल्यानें व्यवस्था होत नसते.

**राघोबा०**—नाहीं तर काय मामा, घरीं बसल्यानें व्यवस्था होत असते ?

**त्रिंबक०**—घरीं बसावें असा विचार मीं श्रीमंतांस दिलाच नाहीं. परंतु घरीं बसून कार्यसिद्धि योग्य रीतीनें होत असल्यास त्यांत म्हणजे भागूबाईपणा येतो असें मला वाटत नाहीं. कांहीं होओ,

पराजय कां होईना; लढाई करायाचीच; हा अविचाराचा दुराग्रह आहे. दादा, आपण असें बोलतां हाच चमत्कार !

**माधव०**—हें ठीक नाहीं. अहो दादा, अहो मामा, शत्रूच मात्र वाद करण्यास योग्य. त्याशीं भांडणें सोडून आपण आपल्यांतच कलह मांडला तर कसें ? मामा म्हणतात ते मलाही बरें दिसते. ज्याअर्थी आपलें लष्कर थकलें आहे व कमीही आहे त्याअर्थीं निजामअल्लीची समजूत पाडून त्यास परतवावें हें ठीक, त्यांतच कार्यसिद्धि आहे. यवनांच्या गर्वाचे खंडन करण्यास आणखी पुष्कळ प्रसंग येतील. सखारामपंत, काल निजामअल्लीचा काय निरोप आला तो पुनः सांगा पाहूं ?

**सखाराम०**—त्या यवनाच्या म्हणण्यांत आपण त्यास बेदर, औरंगाबाद, वगैरे त्याजपासून घेतलेले सर्व मुलूख सोडावे.

**माधव०**—त्याला अशी थैली लिहा कीं, बेदर आणि औरंगाबाद मिळून आम्ही तुम्हांपासून आज तागाईत साल दरसाल सत्तावीस लाख रुपये घेत होतों. त्यास ही थैली पाहतांच तुम्ही येथून ठाणें उठवून जर निघून गेलां तर बेदर आणि औरंगाबादेबद्दलचे सदरहू २७,००,००० रुपये आम्ही मागणार नाहीं; परंतु ठाणें जर न उठवाल तर पेशव्यांची शक्ति किती आहे हें दाखवूं. लिहा—सखारामपंत अशी थैली लिहून आतां शिक्कामोर्तब करावयास घेऊन या.

**सखाराम०**—जी आज्ञा. लिहून आणतों (निघून जातो. पाठीमागून राघोबादादाही कांहीं काम आहे म्हणून निघून जातात.)

कधींकाळीं जयपाळराजावर माणकोजीनीं कांहीं उपकार केले आहेत असें म्हणतात. मग काय असेल ईश्वर जाणे.

**नरहरदेव**–बरें, आपलें ठाणें कोणतें ?

**जयगोविंददेव**–हेंच शहर. आणि आसपासचे नऊ गांव, ठाणें शहरच.

**नरहरदेव**–येऊं आम्ही एक दिवस मौज पाहायाला.

**जयगोविंददेव**–ठीक आहे. धान्यें काय जिकडून तिकडून आणून ओतिताहेत ! प्रातःकाळापासून सायंकाळपावेतों खळ नाहीं !

**नरहरदेव**–येतों आतां. नमस्कार. ( जातात. )

**अंक चवथा समाप्त.**

# अंक ५ चा

## प्रवेश १

( स्थल—धान्याधीशाची कचेरी )

**पहिली भिकारीण**—दादा, तुमास्नी मस्त पुन्न लागल. ह्ये पाठीवर ल्येकरू बगा, ह्ये काकत, आज दोन दीस काइ न्हाई—

" माज्या दादाला लागल पुन्न;
माजा दादा व्हइल धन्न;
माज्या दादाला न्हाई उन्न;
माजा दादा घेतो जुन्न "—

दादा, काइव न्हाई या लेकरास्नी. रातभर खुडखुडखुड करत्यात.

**पहिला कारकून**—अग जा जा तिकडे जा. येथें काय आम्हीं जुन्यापान्याचें दुकान घातलें आहे ?

**पहिली भिकारीण**—अस का जी म्हंगता ? मुठभर खायाला तरी द्या, काइव न्हाई.

**दुसरा कारकून**—अग बाई तिकडे जा. तो बोत उघडला आहे पाहा.

**दुसरा भिकारी**—नारायणा, कृपा कररे देवा.—नमस्कार हो महाराज.

**पहिला कारकून**—नमस्कार.

**दुसरा भिकारी**—लांबून तिकडून श्वेतनगराहून आलों. कोणाचा आधार नाहीं. दोन मुठी धान्य द्याल तर पाहा, ब्राह्मण वांचतो. भगवंता तुझी मर्जी ! आणीक काय !

**पहिला कारकून**—कोण बेटी कटकट ! अरे इकडे काय आहे ! कोणरे बाहेर, कोणी गुमास्ते आहेत कीं नाहींत ?

**दुसरा कारकून**—भटजी बोवा, दक्षणेचें काम तिकडे चाललें आहे. तिकडे जावें.

**दुसरा भिकारी**—ठीक आहे. नमस्कार.

**पहिला कारकून**—नमस्कार.

**पहिला गुमास्ता**—पंचाण्णव, शाण्णव; शाण्णव, सत्याण्णव; ठेवा ठेवा येथेंच ठेवा. तुझ्या सत्याण्णव गोण्या झाल्या, अॅ. चलरे, तुझ्या मोज. एक, एक; दोन—चल लवकर आटोप.

**जयगोविंददेव**—किती उपसल्यारे आज गोण्या ? हं, आळसू नकारे बाबांनों, झपाझप काम चालूं द्या. आली संध्याकाळ होत.

**गुमास्ता**—अग पण थांब बया ! अगोदर ह्याला देतों आणि मग तुला. अशी गर्दी नको उडवूं !

**मनाजीराव**—अर, ह्योबी दरोजा खुल्ला करा. जयगोविंद्येव, आत्र जयगोविंद—

**जयगोविंद**—जी.

**मनाजीराव**—ह्योबी दरोजा खुल्ला करा. येउद्या हिंगडबी आरजदार. हा गुमास्ता न्येमा हित. तिगड बगू कस चालल्या—भल भल; ठीक हाय.—तुमी कुंटलर आरजदार ?

**पहिला अर्जदार**—आमि सरकार तुळजाइच. या पायावगर कुट्ट, कुट कुट्ट थारा न्हायला न्हाई.

**मनाजीराव**—आन तुमीर ?

**दुसरा अर्जदार**—आमि सरकार गायपुरांतल.

**मनाजीराव**—( निरखून पाहून ) आन् तुमी कुटल न्हानार व ?

**अर्जदार**—आम्ही दूरचे आहों.

**मनाजीराव**—आव पन कुटल ?

**तिसरा अर्जदार**—आम्ही विश्वनगरींत राहात असतों.

**मनाजीराव**—तरीच !—तलवारीच काय कारन व ? आन् ढालच बी ? लडाइबिडाई करायची हाय जनु ! तलवारी काय कारनासाटी ?

**तिसरा अर्जदार**—आम्ही क्षत्रिय आहों.

**मनाजीराव**—व्ह व्हय, त्ये सार मी जानतो ! हिगड या. तितन उटून हिगड या. तुमी सा असाम्या—आमि इक्त चालिवलया त्ये अशा करता न्हाइ काय ? बर बर ! या माज्या मागन.

**तिसरा अर्जदार**—आपण काय म्हणतां तें सेवकाच्या लक्षांत आलें नाहीं.

**मनाजीराव**—हिगड या म्हंगतो न्हव ? स्येवक, आन् ह्ये आन् त्यें, बोलनत लई चखोट ! चला या. अशान कुट कारन सादत असत्यात !

**तिसरा अर्जदार**—आज्ञा ऐकणें येथें भाग आहे. मर्जी असेल तिकडे चलावें.

**मनाजीराव**—या तर माज्या मागनच या. ( जातात. )

---

## प्रवेश २

[ जयपाळराज, प्रभावतीबाई आणि मुलगा चंद्रकेतु ]

**जयपाळराज**—या, या, या ! या तुम्ही लुच्चे !

**चंद्रकेतु**—अं अं—( तोंड फिरवितो. )

**प्रभावतीबाई**—जा—कसें शाहाणें बाळ आहे ! तो हातांत खाऊ पाहा. अरे जा !

**चंद्रकेतु**—अं अं; मी नाहीं जा.

**प्रभावतीबाई**—मी नाहीं ज्या ! (वेडावणें आणते.)

**चंद्रकेतु**—कांग तूं ?

**प्रभावतीबाई**—"कांग तूं" कसें तेव्हांच करितां येतें. जा बाळा; माझें बाळ कसें शाहणें आहे !

**जयपाळराज**—बाळ्या, हा काऊ पाहा काऊ.

**चंद्रकेतु**—दे माना. माना दे.

**प्रभावतीबाई**—अरे जा तर.

**जयपाळराज**—चल तर चल.

**चंद्रकेतु**—दे माना, माजा काऊ दे माना. माजा काऊ.

**जयपाळराज**—तुझ्या देवाचा गुलामा ! चला चला—( प्रभावतीबाईच्या कडेवरून ओढून घेतो )—हा घे, हा घे.

**प्रभावतीबाई**—बाळ्या, कोणरे तें ?

**चंद्रकेतु**—( खाऊ खात ) बाब्बा, बाब्बा, बाब्बा— (जय० आणि प्रभा० हंसतात. )

**प्रभावतीबाई**–गोड दिलें म्हणजे जसा मुंगळा मग! मला देरे.

**चंद्रकेतु**–कुठे आहे ? झाला. (तोंडांत धरून हात हालवितो.)

**प्रभावतीबाई**–कसा सोदा आहे पाहा! आणि हें तोंडांतलें कायरे ? घेतें काढून.

**चंद्रकेतु**–हं ! मालीन.

**जयपाळराज**–मुलगा पण पुरा मातृभक्त !

**प्रभावतीबाई**–तरी येथें दबतो थोडासा. मुलांमुलांत खेळत असला म्हणजे पाहावी त्याची दांडगाई !

**जयपाळराज**–बाहेर नेला म्हणजे तरी बुजतो का कांहीं ?

**प्रभावतीबाई**–तो कुठे कोणाच्या देवाला. नाहीं बुजायचा ! वाड्यांत नेला म्हणजे मग तर चेवतो जसा !

**जयपाळराज**–कां बरें ?

**प्रभावतीबाई**–अगोदर राणीसाहेबांना मुलांची हौस थोडी ? आणि त्यांत याचे चार पाहिले म्हणजे त्यांना कोठें ठेवूं आणि कोठें न ठेवूं असें होतें. त्या कांहींना कांहीं कुचेष्टा काढितात; म्हणजे झाला आरंभ. अग बाई बाई, तेथें गेलें म्हणजे कांहीं उपाय नाहींसें करितो !

**जयपाळराज**–ही आई सांगते ! अहाग आई भागूबाई !

**प्रभावतीबाई**–आई काय करील बाई ?

**जयपाळराज**–आईनें दाबावें बाई !

**प्रभावतीबाई**–तर येवढेसें लेंकरूं आणि त्याला येव्हांपासून दाब, आणि हें आणि तें ?

**जयपाळराज**–तर ! तर ! तर !

**प्रभावतीबाई**–पण अगोदर त्या कोठें दावूं देतात ? अम्मळ हूं केलें म्हणजे लागलीच गागतात ! तूं बाई येथें लेंकराला बोलूं नको म्हणतात. आपला आईपणा घरीं ठेवीत जा. लेंकरूं अम्मळ खेळतें तर त्याला मेलें खेळूं देखील देईनास. असें करून रागावतात. मग कोणाची बाई प्राज्ञा पुढें बोलायाची ! पाहा हां आतां तेथलें नांव काढतें म्हणजे पाहा कसें करील.–मी चाललें वाड्यांत. चलाग बायांनो मेणा आणायाला सांगा. चाललें बरें ? ( पदर डोक्यावर घेते. )

**चंद्रकेतु**–अं; घ्ये, घ्ये माना; मी येतों.

**जयपाळराज**–नाहीं जायाचें.

**चंद्रकेतु**–जायाचें. मी आलों. घे गले.

**जयपाळराज**–नाहीं जायाचें.

**चंद्रकेतु**–( ओरडून ) जायाचें जा. तुझें काय जातले ? माना घे गले ? ( रडूं लागतो. )

**प्रभावतीबाई**–ये, ये तूं. ये माझे छोनुकली. ये बरें ये. नाहीं जात बरें ? नकाग सांगूं आणायाला. ( पदर काढिते ) ललायाला काय झालें बाळी ? माझा राजबिंडागबाई राजबिंडा. ( मुके घेते. )

**चंद्रकेतु**–चल वाल्यांत; ने मला तिक्के.

**जयपाळराज**–गेलें कां रडूं आतां !

**प्रभावतीबाई**–मेलें डोळ्याला पाणी होतें कोठें तें !

**चंद्रकेतु**—चल कींगे ? तुझें काय जातें ?

**प्रभावतीबाई**—तर, माझें काय जायाचें आहे! तेवढाच उद्योग मला.

**चंद्रकेतु**—तिते कसा पुक्कल, इक्का इक्का काऊ आहे. ने मला मी नाहीं जा.

**प्रभावतीबाई**—कसाग माझा छोनछकडा बोलतो! बाळ्या बाळ्या, ही मौज पाहिलीसरे तूं ? कशी छांदाल आहे पाहा!

**चंद्रकेतु**—कुते आहे ?

**प्रभावतीबाई**—ही पाहा. ही घे.

**चंद्रकेतु**—दे. कळी मौज माझी! (खेळूं लागतो.)

**जयपाळराज**—हें नातवंड जर आमच्या महाराजांच्या दृष्टीस पडतें, ही बाललीला जर ते पाहते तर त्यांना धन्य झाली असती! याचे बोबडे बोल ऐकून किती हर्ष पावते!

**प्रभावतीबाई**—खरें गडे, त्यांना काय करूं आणि काय नाहीं, असें झालें असतें. आतां असतील तरी कोठें म्हणून समजावें बाई ?

**जयपाळराज**—घरीं बोलावणें पाठविलें, तर तो देशच त्यांणीं सोडिला. आम्हांला हें ऐश्वर्य ईश्वरानें दिलें असतां ते कदाचित् रानांतून अन्न अन्न करीत फिरत असतील! भगवंता, तूं त्यांचा साह्यकारी आहेस.

**प्रभावतीबाई**—हा कडाका जिकडे तिकडे असाच जर पडला असला, तर येथें कधींना कधीं तरी येतील. बारकाईनें असा शोध ठेवावा कीं, लागलीच लोकांनीं ओळखून इकडे आणावे.

**जयपाळराज**—मी आपली त्याविषयीं पराकाष्ठा करीत आहें. देव करो आणि त्यांचा शोध लागो! त्यांचे चेहेरे वर्णन करून, एकूनएक बारीकसारीक खाणाखुणा सांगून सर्व कामगार लोकांस मीं खुद्द कळविलें आहे, कीं अमक्या अमक्या देशचे, असे असे लोक आले असतां बोळवणी न करितां, त्यांस इकडे आणावें. त्यांना पाहून मी कधीं तृप्त होईन, आणि (थट्टेनें) हीं दोन रत्नें दाखवून त्यांना कधीं तृप्त करीन असें मला झालें आहे.

**प्रभावतीबाई**—(हंसून) अहा, काय मेलीं रत्नें धडाना गोडाचीं! होयरे बाळ्या! तूं रत्नरे?

**चंद्रकेतु**—लत्नले, लत्नले!

**जयपाळराज**—हें जास्त कीं हें जास्त, कोण जाणे! दोघांनाहीं आपणाकडून सारखें करावें झालें!

(दोघांचेही मुके घेतो.)

**प्रभावतीबाई**—म्हटलें, काय सारखें करायाचें कोण जाणे! ही हिताचीच गोष्ट झाली! बाहेर जायाची वेळ झाली का इतक्यांत?

**जयपाळराज**—आपणाकडून नाहींच व्हावयाची, पण कांहीं तरी सरकारी काम पाहिलें पाहिजे कीं नको!

**प्रभावतीबाई**—मीं नको म्हटलें का? एवढा वेळ तरी कोणीं सांगितलें बसयाला?

**जयपाळराज**—यांनीं. (पुनः गालाचा मुका घेतो.)

**प्रभावतीबाई**—आतां, वेडच लागलें अगदीं!

**जयपाळराज**—लागूंदे जा! (निघून जातो.)

---

## प्रवेश ३

### [ जयपाळराज आणि मनाजीराव ]

**जयपाळराज**–कोण मनाजीराव! येऊन बराच वेळ झाला वाटतें. मीही आतां बाहेर जावयाच्याच तयारींत होतों.

**मनाजीराव**–न्हाई, वाढोळ झाला नाहीं.

**जयपाळराज**–कांहीं नवलविशेष?

**मनाजीराव**–कोई थोडभूत.

**जयपाळराज**–कांहीं तरी असल्याशिवाय स्वारीचें येणें कशाला होईल!

**मनाजीराव**–आपला वंदुवरग समदा आल्यावानि वाटतोया.

**जयपाळराज**–कशावरून!

**मनाजीराव**–जी, आपून सांगितलेल्या खाना खुना झाडून साऱ्या जमल्यात. नाव, गाव, ठिकाना, तिरतरूपांच नाव, मातुसरीच नाव झाडून सार म्या इचारून घेतल.

**जयपाळराज**–वाहवारे वाहवा! आतांच त्यांची आठवण झाली होती– आणखी कोणी?

**मनाजीराव**–जी, आनिक कुनी दिसत न्हाइता–मग कशी आज्ञा?

**जयपाळराज**–दुसरें तिसरें काय आहे? स्वभाव पालटले आहेत किंवा नाहींत याची परिक्षा करून ओळख द्यावयाची. त्यांचें त्यांजपाशीं, आपलें आपणापाशीं. निदान आमच्या महाराजांचा तरी पत्ता लागेल.

मीही वाड्यांत निघालोंच आहें. तेथें त्यांना आणा म्हणजे सर्व पूसपास करूं.

**मनाजीराव**—जी; येतों तर.

**जयपाळराज**—ठीक आहे. ( मनाजी जातो. )

---

## प्रवेश ४

### [ जयपाळराज, मनाजीराव आणि जयपाळराजांचा बंधुवर्ग ]

**मनाजीराव**—ह्ये आल. जोहार करत्यात.

**जयपाळराज**—कायहो, तुम्ही कोठले राहणार ?

**दुर्मति**—महाराज, आम्ही विश्वनगरींत राहात होतों.

**जयपाळराज**—मग ती नगरी कां सोडावीसें वाटलें ? स्वस्थ सुखानें दिवस घालविण्यांत चित्ताची समाधानी राहीना असें वाटतें.

**दुर्मति व मणिपाळ**—महाराज ?

**मनाजीराव**—आव, येक कुनी तरी बोला.

**विचित्रवीर्य**—महाराज, काय आज्ञा झाली ?

**जयपाळराज**—स्वदेश सोडून इकडे कां येणें केलें ?

**विचित्रवीर्य**—पोटासाठीं महाराज. घरीं अन्न मिळेना, आईबाप, बायका पोरें, उपाशीं मरूं लागलीं—

**मनाजीराव**—पर ह्यो मुल्क कां ?

**विचित्रवीर्य**—ह्या मुलखांत धान्याची समृद्धि आहे असें ऐकिलें; आणि धान्याधिपतींच्या दयाळू स्वभावाचीही कीर्ति ऐकिली.

**जयपाळराज**—असें असें, एवढ्याकरितां आलां काय ? आणि याखेरीज तुमचा दुसरा हेतु आहे असें सिद्ध झालें तर ?

**विचित्रवीर्य**—आमचा दुसरा काय हेतु असणार ! विनंती मान्य करून धान्याची आज्ञा व्हावी, म्हणजे महाराजांसमक्ष परततों.

**जयपाळराज**—तोंवर कार्यसिद्धि होत आहे ! ती झाल्यावर कोण परतणार नाहीं ! तुम्ही आमच्या शत्रूंचे हेर आहां असें जर सिद्ध झालें, तर मग पुढें वाट कशी ?

**विचित्रवीर्य**—आपल्या शत्रूंचे हेर महाराज !

**जयपाळराज**—हो हो, आमच्या शत्रूंचे हेर.

**विचित्रवीर्य**—महाराज म्हणतील तर निरुपाय आहे; परंतु अशा भानगडींत हे सेवक आजपर्यंत पडले नाहींत.

**जयपाळराज**—तर आम्ही उगेच बोलतों !

**विचित्रवीर्य**—आम्ही कसें म्हणूं ? आपण, हजारो लोकांचे पोषणकर्ते, आम्हांवरच विनाकारण शिस्त कां धरतील ?

**जयपाळराज**—हें तुम्हीच पाहा. तुम्ही जर खरे असतां, तर जसे इतके धान्य घेऊन जातात तसे तुम्हीही गेलां असतां. परंतु तुम्हांला कारस्थानें केलीं पाहिजेत ! नसत्या उठाठेवी तुम्हांला ! आज तुमचा घडा भरला त्याला आम्हीं काय करावें ?

**विचित्रवीर्य**—महाराज, नसत्या उठाठेवी आम्हांला कशाला

पाहिजेत ? आपण प्रभु आहां; आपल्या पायांवर हात ठेवून विनंती करितों कीं वृद्ध मातापितरांच्या आज्ञेवरून धान्य मिळविण्या-करितां मात्र येथें आलों.

**जयपाळराज**—काय, तुम्ही सारे एकाच घरचे !

**विचित्रवीर्य**—एकाच घरचे महाराज. आम्ही सारे बंधु आहों.

**जयपाळराज**—सख्खे.

**विचित्रवीर्य**—सख्खे महाराज.

**मनाजीराव**—मजी जूट बरा. फुटाया नग. अनिक कुनी हायता कि न्हाई ?

**जयपाळराज**—हो, हा तपास केला पाहिजे. काय खरें असेल तें सांगा. तुमचा पक्का शोध लाविला पाहिजे.

**मनाजीराव**—त्येला काय येळ हाय ! न सांगितला ह्ये तर काय, अमास्नी लिवता येत न्हाई काय ? लिऊनशेनी आनू.

**जयपाळराज**—आणि तोंवर हे काय करितील येथें ?

**मनाजीराव**—काय करतिला मजी ? काइबी करतिला ! बसतिला हित व्हाव तर बंदीत. त्येत कुनाच काय जायाच हाय !

**जयपाळराज**—खाशी तोड; परंतु ते कां न सांगतील ?—तुम्ही म्हणाल हे इतकी पूसपास कां करितात तर तसें जर न केलें तर हे दिवस कठीण आहेत. आम्ही जाऊं धर्म करायाला आणि आमच्या पाठीस कर्म लागलें म्हणजे ? याकरितां ज्या कोणाचा आम्हांला संशय येईल त्याचें घरदार, सगेसोयरे, यांचा तपास करून आलेल्या संशयाची फेड करावी लागते. तेव्हां आम्ही

विचारितों याचा राग न आणितां खरी हकीकत सांगा, आणि खुशाल लागेल तितकें धान्य घेऊन चला.

**मणिपाळ**–आम्ही चोर नाहीं अथवा चहाड नाहीं; मग कितीही हकीगत विचारिली तरी सांगण्यास बाध कोणता ?

**जयपाळराज**–पूर्वी कोण बोलत होते तेच बोला.

**विचित्रवीर्य**–जी आज्ञा.

**जयपाळराज**–बोला तर; तुम्हांला आणखी बंधु आहेत कीं नाहींत ?

**विचित्रवीर्य**–आम्हांला आणखी कोणी बंधु उरले नाहींत.

**जयपाळराज**–तुमच्या तीर्थरूपांचें नांव काय ?

**विचित्रवीर्य**–त्यांना भीमसेनमहाराज म्हणतात.

**जयपाळराज**–ते आतां कोठें आहेत ?

**विचित्रवीर्य**–सर्व कुटुंबसमुदाय घेऊन यादेशीं आले आहेत.

**जयपाळराज**–या देशीं आले आहेत !

**विचित्रवीर्य**–होय महाराज, यादेशीं आले आहेत.

**जयपाळराज**–या देशीं !

**विचित्रवीर्य**–होय, या देशीं.–त्यांचा वृद्धापकाल जर आपण पाहातां, तर आपलें चित्त तत्काल दयार्द्र झालें असतें. महाराज, निदान त्यांजकरितां तरी एकदा धान्य देऊन आमची रवानगी करावी. ( सुस्कारा टाकून ) काय आम्ही पुत्र !

**जयपाळराज**–कांहो, श्रमी झाल्यासारखें कां करितां ?

**विचित्रवीर्य**—महाराज, श्रमी होऊं यांत नवल नाहीं.

**जयपाळराज**—कां बरें ?

**दुर्मति**—आमच्या श्रमाचें इतरांना काय ?

**जयपाळराज**—बरें तर; तुम्ही आपली सर्व हकीकत सांगत नाहीं तर मी तुमची येथून सुटका होऊं देत नाहीं. मनाजीराव, यांचे तीर्थरूप कोठें आहेत तें विचारून घेऊन त्यांना धरून आणा, आणि त्यांची बारीक चौकशी करा. तोंपर्यंत यांना अडकवून ठेवा.—सांगा तुमच्या तीर्थरूपांचा पत्ता.

**दुर्मति**—कशासाठीं महाराज !

**जयपाळराज**—त्यांना पकडून आणून चौकशी केली पाहिजे.

**दुर्मति**—तर काय एका पुत्राचा ठिकाण नाहीं म्हणून बाकीचेही सर्व मेले काय ? महाराज, आमच्या तीर्थरूपांना आपण चोरासारखें पकडून आणणार !

**जयपाळराज**—तें काय बोललांहो आतां ? एकाचा ठिकाण नाहीं म्हणून सर्वही मेले काय असें जें म्हणतां तो कोणहो एक ?

**दुर्मति**—ती गोष्ट येथें बोलण्याचें कारण नव्हतें, परंतु रागाच्या आवेशांत फटकन तोंडांतून निघाली !

**मनाजीराव**—आव पन काय ती गोष्ट ?

**विचित्रवीर्य**—आपण जर प्रथमपासून आमच्या संकटाकडे पाहून प्रीतिपूर्वक प्रश्न करितां, तर तेंही गृहच्छिद्र मोकळें केलें असतें. परंतु ज्या अर्थीं आम्ही हेर ठरलों, व आमचे वृद्ध तीर्थरूप चोरटे ठरले त्या अर्थीं जास्त बोलून उपयोग दिसत नाहीं.

**जयपाळराज**–हें पाहा, विनाकारण रागावून कांहीं हंशील नाहीं. बरें तें सारें राहो; हा जो उद्गार आपोआप तुमच्या मुखांतून निघाला हा स्पष्ट समजेसा करून आमचें समाधान करा; म्हणजे आणखी जास्त कांहीं एक न पुसतां तुमची पाठवणी करूं.

**विचित्रवीर्य**–महाराजांनीं शब्द दिला ?

**जयपाळराज**–हो दिला.

**विचित्रवीर्य**–महाराज, आम्हांला एक परमगुणी सापत्न बंधु होता.

**जयपाळराज**–मग त्याचें काय झालें ?

**विचित्रवीर्य**–आमच्या तीर्थरूपांची त्याजवर परम भक्ति होती.

**जयपाळराज**–पुत्रावर पित्याची भक्ति असतेच आहे !

**विचित्रवीर्य**–आपण खरें म्हणतां, परंतु त्याजवर अत्यंतच होती. प्रथमविवाहाचा तेवढाच असे, आणि तोही फार सुशील.

**जयपाळराज**–बरें मग ?

**विचित्रवीर्य**–आम्हां दुष्टांना तें पाहवलें नाहीं.

**जयपाळराज**–तर ?

**विचित्रवीर्य**–पूर्ण अभय आहे महाराज ?

**जयपाळराज**–पूर्ण अभय.

**विचित्रवीर्य**–त्याला आम्हीं दुष्टांनीं, कट करून निबिड अरण्यांत, खोल गुहेंत सोडून दिला.

**जयपाळराज**–पुढें !

**विचित्रवीर्य**–त्यापुढें त्याची वाट काय झाली तें अझून पर्यंत आम्हांस ठाऊक नाहीं.–हे जयपाळा, अरे तें कृत्य आमचा रोज सूड

उगवीत आहे. कसेरे आम्ही निष्ठुर झालों होतों!—महाराज, आपणच पाहा, आम्ही आमच्या तीर्थरूपांशीं पुत्राच्या नात्यानें किती वागलों ?

**मणिपाळ**—आणि त्या गोष्टीचा पुरा पश्चात्ताप होत असतां पुनः त्यांना संकटांत आमच्यानें कसें पाहवेल ?

**दुर्मति**—जर आपण त्यांना धरून आणणार असलां तर अगोदर आम्हां सर्वांचें येथें शिरच्छेदन करावें.

**मणिपाळ**—महाराज जर न करितील, तर आम्ही साहस करून तसें करण्याचें अगत्य पाडूं.

**जयपाळराज**—मनाजीराव, पाहा ?

**मनाजीराव**—जी काइबी झाल तरी वागाच घरान !

**मणिपाळ**—महाराज, कशी ती एकदां लवकर आज्ञा व्हावी.

**जयपाळराज**—शाबास मणिपाळा;—तुमचें बोलणें ऐकून मला फार आनंद झाला. तुमच्या वृद्ध पितरांस कशाचीही तूट पडणार नाहीं. तुमचे तीर्थरूप तेच माझे तीर्थरूप. तुम्ही माझे बंधु; मी तुमचा जयपाळ. नीट पाहा माझे तोंडाकडे आणि मला ओळखा. आतां मनांत कशाचीही चिंता करूं नका. हें सर्व वैभव तुमचें आहे. तीर्थरूप मात्र कोठें आहेत तें लवकर सांगा म्हणजे त्यांना आणवूं.

**विचित्रवीर्य**—अरे होयरे होय! आमचा जयपाळच हा खरा ! मला प्रथमपासूनच कसेंसें वाटत होतें !

**दुर्मति**—जयपाळराज, आम्हांला क्षमा करा. आम्ही गुन्हेगार खरे, परंतु केल्या कर्माचा आम्हांस पुरा पश्चात्ताप झाला आहे.

**जयपाळराज**—त्याजविषयीं आतां बोलूं नका. हा तसा समय नव्हे. चला तीर्थरूपांना घरीं आणूं आणि आनंद करूं. (जातात.)

---

## प्रवेश ५

### [ जयपाळराज, भीमसेनमहाराज ( तीर्थरूप ), बंधुवर्ग, प्रभावतीबाई आणि चंद्रकेतु ]

**भीमसेनमहाराज**—अरे हें सारें स्वप्न कायरे! हा सारा भास तर नव्हेना! काय, माझा जयपाळच माझ्या समोर उभा आहे! अरे चांडाळांनो, अझून तरी खरें बोला! नव्हे नव्हे, हा माझा जयपाळ नव्हे! माझा जयपाळ तो हा नव्हे. त्याला जाऊन आज बारा वर्षें झालीं. आतां तो कसचा परततो! म्हाताऱ्या, आतां तुला कशाचा जयपाळ भेटतो! माझा जयपाळ वनांत गेला; माझा जयपाळ नाहींसा झाला; माझा जयपाळ स्वर्गी गेला! ( डोळे भरून येतात. )

**जयपाळराज**—नाहीं महाराज, आपला जयपाळ तोच हा. मी आपलाच. मला ओळखा. आपण जर आतां हा माझा नव्हे म्हणाल, तर मग मात्र या प्राण्यासारिखा अनाथ पृथ्वीवर कोणी नाहीं.

**दुर्मति**—होय महाराज, आपला पुत्र जयपाळ तो हाच. आतां व्यर्थ शोक पुरे.

**भीमसेनमहाराज**—कायरे दुर्मति, माझा जयपाळ अझून जिवंत आहे कायरे? कायरे मणिपाळा, त्याची तुमची गांठ पडली नाहींना? जयपाळा, जयपाळा असा कोणीकडे भटकलास!

**मणिपाळ**—सर्व अन्याय आम्हीं कबूल केला आहे. आम्हीं आपली भलतीच समजूत घातली होती अशी जी आतांच विनंती केली ही मात्र खरी. हा जयपाळ पुढें उभा आहे. आम्हीं दुष्टांनीं घात चिंतिला, परंतु कृपाळु परमेश्वरानें कल्याण केलें.

**भीमसेनमहाराज**—बा जयपाळा, मला पुन्हा कडकडून भेट. आज बारा वर्षे तुजकरितां रडून रडून डोळे मंद झाले. अरे ज्या मला कोसावरचा पदार्थ ओळखूं येत होता त्या मला माझा जयपाळ दोन पावलांच्या अंतरावरचा दिसत नाहीं !

( पितापुत्र भेटतात. )

**प्रभावतीबाई**—( आंत येऊन नमस्कार करिते. )

**विचित्रवीर्य**—वहिनी नमस्कार करितात.

**भीमसेन०**—कोणगे बाई ?

**प्रभावतीबाई**—मी प्रभावती.

**विचित्रवीर्य**—जयपाळराजांची बायको.

**भीमसेन०**—जयपाळा, तुझी बायको काय रे ?—मुली, अष्टपुत्रा सौभाग्यवती हो. कोणाचीग बाई मुलगी तूं ?

**जयपाळराज**—( हंसत ) येथें मुख्य न्यायाधीश आहेत.

**प्रभावतीबाई**—( मुलास ) जा, नमस्कार कर.

**चंद्रकेतु**—तूं कलीनस ?

**प्रभावतीबाई**—अरे मीं केला. तूं कर आतां. जा, असें म्हणूं नये.

( हळूहळू जवळ जाऊन नमस्कार करितो. )

**विचित्रवीर्य**—धाकटा नातु नमस्कार करितो.

**भीमसेन०**—कोण ? जयपाळा तुझा मुलगा ?—या तुम्ही, या तुम्ही. अरे वाहवारे वाहवा ! एक मुकू देरे बाळा, छांदालसा. ( मुका घेऊन )—काय गोल आहेले मुकू ? बाळा मी कोण रे ?

**चंद्रकेतु**—माना काय ताऊक ?

**जयपाळराज**—आजोबा बरें ? कोण ?

**चंद्रकेतु**—आदुबा.

**दुर्मति**—म्हणजे कोण रे ?

**चंद्रकेतु**—म्हंजे ? म्हंजे आदुबा. ( सर्व हंसतात. )

**भीमसेन०**—तुझें नांव काय रे बाळा ?

**चंद्रकेतु**—तंद्लकेतु.

**भीमसेन०**—काय ?

**जयपाळराज**—चंद्रकेतु.

**भीमसेन०**—तंद्लकेतु काय ? तंद्लकेतु, तूं कोणाबरोबर येथें आलास ?

**चंद्रकेतु**—मी घोल्यावलून आलो. कछा छांदाल, यञ्हला यञ्हला, घोला आहे माजा !

**भीमसेन०**—आम्हांला दाखव रे बाळा तो तुझा घोडा.

**चंद्रकेतु**—मालील तुमाला. मना कुते मालतो ? मना नाहींच मालीत. ( सर्व हंसतात. )

**भीमसेन०**—मुली, मुलगा हुशार आहे.

( प्रभावती लाजते. )

**चंद्रकेतु**—आन् मी कथा अथ्था घोल्यावल बथलो आन् तो कथा अथ्था उलाला ! नाहीं ग बाई ? ( प्र० हंसते )—तुम्हांला कुते येते बथ्था !

**भीमसेन०**—नाहीं रे बाळा, आम्हांला कशानें येतें ? तूं शिकवशील ?

**चंद्रकेतु**—माझ्या फुलें बताल घोल्यावल ?

**भीमसेन०**—हो; शिकायाचेंच आम्हांला. मग पुढें कां नाहीं बसणार रे बाबा ? मुली, आज रात्रीं याची दृष्टि काढ बरें ? बाळा, आणखी एक मुकू दे पाहूं ?

**चंद्रकेतु**—आतां नाहीं गले !

**भीमसेन०**—गुलामा, तुझे काय दोन चव्वल खर्च होतात त्यांत ! ( मुके घेतो )—आज केवढा आनंदाचा दिवस मला उगवला ! जयपाळा, तुजसारिखाच तुझा मुलगा पराक्रमी व भाग्यशाली होओ !

**जयपाळराज**—वडिलांच्या आशीर्वादानें सर्व कांहीं होईल.—आपण येणार ही बातमी काल वाड्यांत छत्रपतींना समजल्यावरून मला आज्ञा झाली कीं आपणांस भेटवावें.

**भीमसेन०**—फार उत्तम गोष्ट आहे. अरे राजद्वारीं रिक्तहस्त जाऊं नये बरें ? कांहीं तिकडचे पदार्थ असतील ते काढा.

**जयपाळराज**—पूर्वेकडे येथून पंधरा कोसांवर माणिकपूर महाल आहे तो तुम्हांस व तुमचे कुटुंबास वंशपरंपरेनें इनाम दिला आहे अशा अर्थाची सनद करून छत्रपतींनीं आपल्या हातानें तिजवर मोर्तब केलें आहे. नको नको पुष्कळ म्हटलें, परंतु उपाय चालेना. उद्यां भेटीच्या वेळीं ती सनद हातावर ठेवितील.

**भीमसेन०**—ते देणार समर्थच आहेत. पुढें तुम्ही मात्र एकत्र, एकविचारें राहून त्यांच्या कृपेस योग्य पात्र आहों असें दाखवा—मला आतां थोड्याच दिवसांत वरचें बोलावणें येईल हें माझी मनदेवता

मला सांगते. तर बा जयपाळा, बा विचित्रवीर्या, एक मात्र करा. ऐकलेंरे दुर्मति, जरी मीं येथें देह ठेवला तरी माझ्या अस्थी स्वदेशीं नेऊन ब्रम्हतीर्थांत टाका. करालना रे! मणिपाळा, वीरभद्रा, शूरसेना, विसरूं नका बरें ? आतां एवढेंच तुम्हां पुत्रांपाशीं मागणें आहे. जयपाळा, आमची तर्तूद राखण्यांत आज तुला फार श्रम झाले आहेत. जा बाबा थोडी विश्रांति घे.

**जयपाळराज**—आपणही थकून भागून आलां आहां तर विश्रांति घ्यावयास चलावें.

(सर्व निघून जातात.)

**अंक पांचवा समाप्त.**

## [ विदूषक आणि सूत्रधार ]



**विदूषक**—कायरे सूत्रधारा, हा काशीकरपणा कोठें शिकलास ?

**सूत्रधार**—कोणता काशीकरपणा रे बाबा ?

**विदूषक**—हं हं ! तुला वाटतें विदूषक म्हणजे काय पदार्थ आहे! अक्कलवंताच्या गाभ्या ! आम्हांला अगदी कोपऱ्यांत राज्य दिलेंस हें कसें काय ?

**सूत्रधार**—अहो आपण कां कोपऱ्यांत बसतां ! असे या समोर.

**विदूषक**—येऊन तोंडावरच्या माशा मारीत बसूं कायरे बा ! ऐकिलें; ऐकिलें; म्हटलें तुझें नाटक ऐकिलें; चालला नाटक करायाला !

**सूत्रधार**—कांरे बाबा, तुझें काय बिघडलें ?

**विदूषक**—नाहीं नाहीं, म्हटलें ऐकिलें; तुझें नाटक ऐकिलें.

**सूत्रधार**—अरे, हो हो म्हटलें ऐकिलेंस. मग म्हणतोस काय ?

**विदूषक**—असा वर्दळीवर नको येऊं; पण म्हटलें ऐकिलें. चालला नाटक करायला !

**सूत्रधार**—आणखी एकदा.

**विदूषक**—आणखी एकदा कशाला ? समग्र ऐकिलें. समजली कारागिरी. एक आर्या मिळेना -एक श्लोक मिळेना—एक ओंवी मिळेना. बृहस्पति नाटक करतो ! कशी रांग लागावी—दिंडी—साक्या—पदें—चूर्णिका, कीं लोकांनीं म्हणावें यंव !

**सूत्रधार**—नाटकालारे हीं कशाला पाहिजेत? अरे मोठे मोठे म्हणतात कीं तुझे श्लोक–आर्या, दिंड्या हीं सर्व या रंगभूमीवर झांकून ठेवावीं.

**विदूषक**—तुझे थोर थोर आहेत मोठे शाहाणे. भल्या माणसा, याकरितां विदूषक लागत असतो. अरे तें इकडे सोंपवून द्यावयाचें होतें. ऐशी बहार दिली असती उडवून! तुला पाहायाचा आहे आमच्या कवितेचा मासला? थोडक्यांत तुजवर नक्षा करितों ऐक.

ओंवी

"ऐकाहो सकळ जन"

सूत्रधारा, नीट खुबी पाहा. अंतीं 'जन' त्याला आहे शेवटीं 'न'.

"ऐकाहो सकळ जन। देऊनियां पूर्ण मन"

जन, मन. कां, कशी आहे सांगड! आणखी खुबी आहे, "पूर्ण मन" पूर्ण शब्दाची ठेवण पाहा. नाहीं तर अर्धे मन जाईल केळें खायाला व अर्धें मन राहील इकडे! तसें नाहीं, म्हणून म्हणतात "पूर्ण मन."

"देऊनियां पूर्ण मन। चोरूनी नेणार हा धन"

"तुमचीयें सर्वस्वी."

पाहा एकादा तुमचें म्हणता! तीं बेटीं साधारणाचीं कामें. आम्ही तुमचीयें म्हणतों.

**सूत्रधार**—अहाहा! एकून खरे कवि आपण!

**विदूषक**–बोलूं नको ऐक. आणखी म्हणतात–

" हा मायिक सूत्रधारू । उगाच हाकितो बडिवारू "

' बडिवारू ' शब्दाचा ज्ञानोबांनीं उपयोग केला आहे बरें काय! उगीच काल आजच्या शब्दांची योजना करणारे नव्हेत हे! "बडिवारू"– काय शब्द आहे!

" दावोनियां तयातें जोरू "

" जोरू " म्हणजे समजलास? जसें सूत्रधाराचें धारू केलें, जसें बडिवाराचें बडिवारू केलें, तसें जोराचें " जोरू. "

**सूत्रधार**–वा: एकून स्वर्ग पाताळ एक करणारी कविता बाबा!

**विदूषक**–" दावोनियां तयातें जोरू "

" मार्गस्थ करावा पैं "

कां " पैं " ची खुमारी कशी आहे? खुबी सांगतों तुला सूत्रधारा. ओंवीचा एक चरण गेला, म्हणजे दुसऱ्या चरणांत द्यावाच " पैं " ढकलून!–श्लोक–

**सूत्रधार**–श्रोते म्हणतात फार कष्ट झाले. आतां पुरे करावें.

**विदूषक**–आमची, आमची कविता ऐकून कष्ट झाले! अरे तूं आहेस कोठें! आमची कविता ऐकून श्रोत्यांना कष्ट झाले!

**सूत्रधार**–भलत्याचें भलतेंच. तसें नव्हे. असें म्हणेल त्याची जिव्हा झडो! श्रोते तर हृष्ट झाले; परंतु आपणाला कष्ट झाले असें त्यांचें म्हणणें.

**विदूषक**—अरे आम्हांला कशाचे कष्ट होतात! आम्ही कवि म्हणजे प्रसादी पुरुष. आमची प्रासादिक वाणी. कष्टाची भीतिच धरूं नको तूं.

**सूत्रधार**—(हळू) मूर्ति कोपऱ्यांत बसली होती ती बरी होती.

**विदूषक**—काय, काय म्हटलेंस? कुरकुर कशाची लावितोस? अरे ऐकवितों तोंवर घे ऐकून, मग बसशील हाका मारीत!

**सूत्रधार**—म्हणूनच म्हटलें, आपण स्वस्थ बसावें. न जाणो आपली वाणी देवदूतांच्या कानीं पडली आणि त्यांना अशी इच्छा झाली कीं, आपल्या मेळ्यांत, अग्रभागीं या मूर्तीस नेऊन बसवावें. तर मग? आम्हां मृत्युलोकींच्यांचें कांहीं चालावयाचें आहे? उगाच त्यांणीं सत्कारपूर्वक धरून नेलें म्हणजे आपलीं पोरेंबाळें रडतील तीं रडतील आणि त्यांजबरोबर आम्हांला हेळ ओढावे लागतील. तेंही असो. रडूं घटिकाभर! पण पुनः वाणी नाहींना ऐकायला सांपडणार? ती पुष्कळ दिवस आपण ऐकवावी म्हणून विश्रांति घेण्याविषयीं बोललों.

**विदूषक**—काय लाख रुपयांची गोष्ट बोललास सूत्रधारा! माझ्या गुणाचें पूर्ण ज्ञान तुलाच झालें आहे. काय सांगूं? तुला जिवाची गोष्ट सांगतों. माझ्या पाठीमागें कविता चालेल कीं नाहीं याचा वारंवार संदेह प्राप्त होतो! मग अतोनात खेदानें चित्त व्याप्त होतें. असें वाटतें कीं, देवा हा मीं कवितारूप वृक्ष या लोकीं लाविला; परंतु याला यथेच्छ आज्य घालून याची ज्वाला कोण प्रज्वलित करील आणि याच्या लाटा कोण सर्व देशभर पसरील तो पसरो!

**सूत्रधार**–विदूषक महाराज, एकूण आपली कविताशक्ति साधारण बोलण्यांत सुद्धां झकाकते ! वृक्ष, आज्य, ज्वाला, लाटा, काय अद्वितीय श्रेणी एकसारखी ना !

**विदूषक**–अरे काय, उपाय चालत नाहीं. उपमेवर उपमा, उपमेवर उपमा, अशा सुचतात कीं अनर्थ होतो !

**सूत्रधार**–अनर्थच खरा !

**विदूषक**–पण यापासून आम्हांला कांहीं सुख आहे काय ? आम्हांपाशीं गुण आहे हें लोकांना कोठें सहन होतें ? अरे, तुक्या म्हणून एक लहानसा कवि होऊन गेला. त्यानें म्हटलें आहे.

"नीचपण बरवें देवा"

"न चले कोणाचाही हेवा" ऐकिलेंस काय ?

"महापुरें झाडें जाती । तेथें लोहाळे राहती."

"लोहाळे राहती"; या राहतीच्या ठिकाणीं "निजती" असें असतें म्हणजे फार शोभलें असतें !

"महापुरें झाडें जाती । तेथें लोहाळे नीजती"

**सूत्रधार**–मला वाटतें "मरती" असें जर असतें तर फारच शोभलें असतें !

**विदूषक**–छे बेट्या, अर्थाचा अनर्थ नको करूं. तुला त्यांतली खुबी नाहीं ठाऊक. "तेथें लोहाळे नीजती"–'नीजती' समजलास 'नीजती'. बरें कसें एक श्लोक देऊं ना ह्मणून ?

**सूत्रधार**–आतां काय सांगूं ? अपरात्र तर होऊन चुकली आहे! पण त्यांतून नसलेंच आम्हांला सोडायाचें तर मग लावा तडाका!

**विदूषक**–बरें तर तुझी मर्जी. राहूंदे आज, आणखी केव्हां तरी देऊं मौज उडवून! "वेताळ चालिले पूर्वस्थाना" (जातो.)

**सूत्रधार**–अहारे पुतळा! बरीच पिडा गेली! आतां आपणही जावें. (जातो.)



# रा. ब. विनायक जनार्दन कीर्तने
## यांचें चरित्र



बाळकृष्ण नारायण देव

यांनीं लिहिलें



१९२७

# ग्रंथसमर्पण

## कै. ती. मातुःश्री आनंदीबाई

ऊर्फ

## माई कीर्तने

ज्यांच्या सहवासांत प्रस्तुत चरित्रलेखकाच्या विद्यार्थिदशेंतला बराच भाग

**वात्सल्यसुखाचा अमृतोपम अनुभव घेण्यांत गेला**

व त्या काळीं त्याच्या

**मातृहीन स्थितीचें स्मरण ज्यांनीं होऊं दिलें नाहीं**

आणि

हा ग्रंथ ज्यांच्या हयातींत प्रसिद्ध व्हावा अशी त्याची अत्युत्कट
इच्छा असतां तारीख १९ डिसेंबर १९०३ रोजीं

**ज्यांचा प्लेगनें अंत झाला**

**त्यांच्या संस्मरणार्थ हा ग्रंथ अर्पण केला आहे.**

लेखक.

# प्रस्तावना



प्रस्तुत चरित्रनायक हे अर्वाचीन राजकारणी पुरुषांत बरेच प्रमुख असून त्यांनीं बडोदें व इंदूर या दोन संस्थानांत मोठीं कामें केलीं होतीं. तेव्हां त्यांचें आयुर्वृत्त बरेंच बोधप्रद होईल असें समजून मीं हें चरित्र लिहिलें आहे. त्यांत यश कितपत आलें आहे हें पाहणें वाचकांकडे आहे.

मीं चरित्रविषयावर बरेंच वाचलेलें आहे व कांहीं थोडेंसें लिहिलेलें आहे; पण चरित्रनायकाच्या सहवासांत राहून त्याचें गुणवर्णन करण्याचा हा पहिलाच प्रसंग होय. यांत मीं चरित्रनायकाचे यथार्थ गुणदोष आपल्या बुद्धीप्रमाणें निःपक्षपातानें प्रगट केले आहेत. मीं त्यांच्याविषयीं भाविकभक्ति आणि विरोधभक्ति या दोन्ही मनोहर वृत्ति जाहिर केल्या नाहींत, किंवा आपल्या मताप्रमाणें मी त्यांस वश झालों नाहीं. मला जर हें चरित्र वाचकांस हितावह व अनुकरणीय होईल असें वाटलें नसतें, तर माझा चरित्रनायकाबद्दल कितीही आदर व पूज्यभाव असला तरी मीं त्यांचें चरित्र लिहिण्याचें काम कधीं पत्करलें नसतें. आतां तें लिहिण्यांत कदाचित् गैरसमजुतीनें कांहीं प्रकार अन्यथा झाला असेल; नसेल असें म्हणवत नाहीं. तथापि तशा बाबतींत यथार्थ प्रकार उघड करणें त्यांचे अनेक विद्वान् सहाध्यायी व स्नेही यांस शक्य आहे आणि तें ते करतील अशी आशा आहे.

अलीकडे रा० ब० कृष्णाजी लक्ष्मण नूलकर, गोपाळराव हरी देशमुख, दादोबा पांडुरंग, आत्माराम पांडुरंग, ना. काशीनाथ त्र्यंबक तेलंग, श्रीपाद बाबाजी ठाकूर इत्यादि थोर, राजकारणी, व विद्वान् सुधारक पुरुष गत झाले, परंतु त्यांचें चरित्र किंवा यथार्थ गुणवर्णन त्यांच्या कोणींही परिचित विद्वान् स्नेह्यांनीं करण्याचें मनावर घेतलें नाहीं. ही चरित्रलेखनाविषयींची विन्मुख वृत्ति आमच्या राष्ट्राचीच आहे असा पाश्चात्य विद्वानांचा आम्हांवर यथार्थ आरोप आहे. त्याचें निराकरण पाश्चात्य शिक्षणप्रसार बराच झालेल्या अशा प्रस्तुतकाळीं विशेष झालें आहे असें नाहीं. यास अपवादरूप विष्णुशास्त्री

चिपळूणकर यांचें एक चरित्र असून दुसरें ना० विश्वनाथ नारायण मंडलिक यांचें चरित्र एक विद्वान् चरित्रकार लिहून विविधज्ञानविस्तार मासिकपुस्तकांत छापीत आहेत तें, अशीं दोनच मुख्यतः होत. तथापि वरील महाशयांचीं यथार्थगुणदर्शक चरित्रें त्यांच्या देशबांधवांस अनेक प्रकारांनीं हितावह होणारीं आहेत. तीं त्यांच्या परिचयांतले मार्मिक विद्वान् प्रगट करण्याची कृपा करतील तर मराठी सारस्वताचें मोठें कल्याण होईल. या कामीं त्यांस सूचना देण्यासाठीं म्हणून मीं अल्पमति असूनही हें काम हातीं घेतलें. चरित्रलेखन अनेक प्रकारांनीं मोठें नाजूक व बिकट काम आहे असें जॉनसननें म्हटलें आहे. कारण चरित्रनायकाच्या संबंधानें "अशेषसत्यप्रतिपादन" त्याच्या जीवनकालास निदान चार पांच तपें लोटल्यावांचून निःपक्षपातानें करण्यास अनेक अडचणी असतात. बरें, इतका अवधि लोटूं दिला तर तें करण्याचीं साधनें म्हणजे त्यांबद्दलचें लोकमत, त्यांच्या परिचितांचा अनुभव, त्यांचें अंतर्गत गुणज्ञान इत्यादि गोष्टी कालवशानें मलिन, अस्पष्ट व अंधुक होतात. त्यामुळेंच डॉ० जॉनसननें आपल्या कविचरित्रांत अर्वाचीन व समकालीन चरित्रनायकांबद्दल जरी सत्यप्रकारच प्रगट केला आहे, तरी तें "अशेष व संपूर्ण सत्य" नाहीं असें स्पष्ट म्हटलें आहे. कारण तो मार्ग म्हणजे "विस्तव पूर्ण न विझलेल्या अशा फुपाट्यांतून चालण्यासारखा आहे." असें तो विद्वान् चरित्रकार म्हणतो. परंतु अशी स्थिति असली तरी आणि "अशेष व संपूर्ण सत्य" निवेदन करण्याची वेळ आली नाहीं तरी पाश्चात्य पंडितांचीं व राजकीय महापुरुषांचीं चरित्रें त्यांच्या हयातींत व मागें देखील प्रसिद्ध होत नाहींत असें नाहीं. उदाहरणार्थ ग्लॅडस्टन, फॉसेट वगैरेंचीं चरित्रें पहा. तेव्हां हा मार्ग केवळ अनुल्लंघनीयच नाहीं आणि या दिशेनें जाणें सर्वथैव अशक्यच आहे असें नाहीं. कोणीही मनुष्य सर्वगुणसंपन्न किंवा सर्वदोषविवर्जित असतो असें नाहीं. थोर पुरुष तर आपले दोषही प्रांजलपणें कबूल करतात. मग त्यांच्या दिग्दर्शनापासून अपाय तो कोणता ? आपल्या थोर चरित्रनायकांचे दोष प्रगट करावे, आणि त्यांवर आक्षेप घेतल्यावर त्यांचें निरसनही सयुक्तिक कारण दाखवूनच करावें हा श्लाघ्य मार्ग दिसतो. तोच आदरून मींही यांत गुणदोषांचें यथामति दिग्दर्शन केलें आहे.

आमचे चरित्रनायक स्वतः फारसे स्तुतिप्रिय नव्हते, तेव्हां त्यांच्या

स्वर्गस्थ आत्म्यासही हा आपले विषयींचा गुणदोषविवेचनात्मक चरित्रलेख त्यांच्या एका आश्रित आप्तानें लिहिलेला पाहून आनंदच वाटेल अशी माझ्या मनाची पूर्ण खात्री आहे. कारण ' Paint me as I am ' हें क्रॉमवेलचें मत त्यांस फार प्रिय होतें हें मला माहीत आहे.

यांत दिलेली बरीच माहिती कागदपत्रांवरून मिळविलेली आणि चरित्रनायकाच्या अनेक वर्षांच्या सहवासानें मला स्वतःला कळलेली होती व तिजवरूनच हें चरित्र मुख्यतः लिहिलें आहे. त्यांचे आप्त व स्वकीय यांजकडून या कामीं फारच थोडी मदत झाली. याचें कारण, चरित्रनायकाच्या गुणांविषयीं अनभिज्ञता नव्हे, तर आमच्या लोकांची अशा कामीं अनास्था हें होय. असो. मला मिळालेली माहिती मीं निःपक्षपातबुद्धीनें आणि सत्यभक्तीनें आपल्या समजुतीप्रमाणें प्रगट केली आहे.

हें चरित्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्याचें श्रेय चरित्रनायकांचे चिरंजीव रा. रा. दामोदर विनायक कीर्तने, ब्यारिस्टर-ॲट-लॉ, इंदूर संस्थानांतील सदर कोर्टाचे दुसरे न्यायाधीश, यांचेकडे आहे. त्याचप्रमाणें त्याचीं प्रुफें तपासण्याच्या कामीं माझे सन्मान्य मित्र प्रोफेसर राजाराम शास्त्री भागवत व रा. रा. वासुदेव गोविंद आपटे या उभयतांनीं मनःपूर्वक मदत दिली आणि वेळोवेळीं अनेक सूचना केल्या याबद्दल त्यांचाही मी फार आभारी आहें.

इंदूर, ता. १६ एप्रिल,<br>स. १९०४ इ.

बा. ना. देव.

# विनायक जनार्दन कीर्तने



पुणें जिल्ह्यांत जुन्नर तालुक्यांत राजुरी नांवाचें एक लहान खेडें आहे, तें प्रस्तुत चरित्रनायकाच्या पूर्वजांचें मूळ ठिकाण होय. कीर्तने हें नांव मराठ्यांच्या इंग्रजी इतिहासग्रंथांत किंवा मराठी बखरींत आढळत नाहीं, यावरून या घराण्यांतील पुरुषांनीं मराठी राज्याच्या घडामोडींत किंवा उलाढालींत कांहीं मोठासा कार्यभाग केला होता असें दिसत नाहीं. सन १८९६ सालच्या फेब्रुवारी महिन्यांत कै. नीळकंठराव कीर्तने—ज्यांस इतिहासविषयाचा बराच व्यासंग असून त्यावर शोध करण्याचा फार नाद असे—यांच्याशीं प्रस्तुत लेखकाचें वरील संबंधांत बोलणें झालें तेव्हां त्यांनीं ही गोष्ट मान्य केली, आणि दंतकथेच्या आधारानें आपल्या घराण्याबद्दल पुढील माहिती सांगितली:—

थोरल्या बाजीराव पेशव्यांच्या कारकीर्दींत रामाजीपंत नांवाचा परम एकनिष्ठ विठ्ठलभक्त ब्राह्मण राजुरीस रहात होता. दर महिन्यास एकादशीला पंढरपुरीं वारी करण्यास तो पायीं जाई. त्याप्रमाणें एकदां तो वारीला निघाला असतां मार्गांत खरे उपनामक एका छोट्याशा जहागिरदाराचीं दोन मुलें एका तळ्यांत पोहत असतांना बुडूं लागलीं असें त्यानें पाहिलें, आणि पाण्यांत उडी घालून त्यांस वांचविलें. पुढें तो तसाच वारीस गेला. आपणांवर गुजरलेला घोर प्रसंग व त्यांतून त्या उदार पुरुषाच्या हातानें झालेली अकल्पित सुटका, हीं त्या मुलांनीं आपल्या आईबापांस कळविलीं. या उपकाराची फेड अंशतः व्हावी म्हणून त्या जहागिरदारानें रामाजीपंतास रस्त्यांतच गांठून त्यास आपल्या घरीं नेण्याची पराकाष्ठा केली, पण व्यर्थ. वारीनिमित्त घर सोडल्यावर ती संपण्याचेपूर्वी परत पाऊल घेणें नाहीं अशा कृतनिश्चयानें रामाजीपंतानें खऱ्यांच्या अत्याग्रहास देखील मान दिला नाहीं. परंतु पुढें एखाद्या वेळीं त्यांच्या घरीं जाण्याचें त्यानें कबूल

केलें आणि वारी आटोपल्यावर त्यानें आपलें वचन पाळलें. त्यानें त्या जहागिरदाराच्या घरचा पाहुणचार व आदर अनुभविला, आणि त्याची इच्छा पुरविली. खरे व कीर्तने या घराण्यांच्या स्नेहसंबंधाचें हें मूळ होय.

उत्तरोत्तर हा ऋणानुबंध वाढत गेला. पेशव्यांच्या दरबारीं खऱ्यांचें वळण होतें. त्यायोगानें त्या राज्याच्या चाकरींत रामाजीपंतांचा शिरकाव झाला. पुढें त्यांस जुन्नर तालुक्याची मामलेदारी मिळाली. हें काम त्यांनीं पुष्कळ वर्षे केलें आणि बराच पैसा मिळविला.

अशा संपन्न स्थितींतही रामाजीपंतांची पंढरीची पायीं चालण्याची वारी सुटली नाहीं, इतकी त्यांची एकनिष्ठ विठ्ठलभक्ति होती. शेवटीं वार्धक्यांत पायीं जाण्याचे क्लेश होत, तरी त्यांचा निश्चय ढळेना. अशा स्थितींत एके रात्रीं त्यांस दृष्टांत झाला. त्यांत विठ्ठलानें त्यांस सांगितलें "मीच तुझ्या घरीं येतों. आतां पंढरपुरास पायीं जाण्याची दगदग तूं करूं नकोस." स्वप्नांत निर्दिष्ट केलेल्या स्थळीं दुसरे दिवशीं त्यांस विठ्ठलमूर्ति सांपडली व तेव्हांपासून त्यांची पंढरीची वारी सुटली.

रामाजीपंतांचें मूळ आडनांव घनसरे असें होतें. त्यांस कीर्तनाचा व भजनाचा फार हव्यास होता. म्हणून "या कीर्तने!" असें थट्टेनें ते येतांच पेशवे म्हणत, त्यावरून इतरही तसेंच म्हणूं लागले. असें होतां होतां लौकिकांत हेंच नांव या घराण्यास पडलें, आणि मूळचें होतें तें लोपलें. कीर्तनरंगांत ते तन्मय होत असत. एकदां त्यांचे वाड्यास आग लागली, तरी भजनांत निमग्न असल्यामुळें त्याचें त्यांस भान राहिलें नाहीं.

सध्याच्या विचिकित्सक व श्रद्धाहीन काळीं वरच्यासारख्या दंतकथांवर कितीकांचा विश्वास बसेल तो बसो. पण रामाजीपंत निस्सीम भक्त होते ही गोष्ट त्यावरून उघड दिसते. त्यांचे पुत्र धोंडोपंत हेही पेशव्यांच्या राज्यांत कामावर होते. त्यांचे पुत्र हरीपंत हे अव्वल इंग्रजींत नेवाशास शिरस्तेदार होते. त्यांनीं चाळिशी उलटल्यावर शेवडे उपनामक गृहस्थाच्या एका दोनअडीच वर्षांच्या मुलीशीं लग्न केलें.* मुलीच्या आईनेंच हें विवाहकार्य दुराग्रहानें

* या मुलीच्या वडील बहिणीशीं त्यांचा तिसरा विवाह प्रथम झाला होता. तिच्या पाठराखणीस मुलीची आई आणि आईच्याबरोबर तिची धाकटी मुलगीही आली होती.

उरकून घेतलें. त्यावेळीं तिचा पती घरीं नव्हता. त्याची तिनें संमति घेतली नव्हती, आणि त्यास तें मान्य होणार नाहीं, हें ती जाणत होती. या तिच्या धारिष्टाचें आणि अविचाराचें नवल वाटणें साहजिक आहे. अलीकडे विदेशी कल्पनांचा प्रसार झाल्यानें स्त्रियांच्या स्वातंत्र्यापासून होणाऱ्या दुष्परिणामांविषयीं पुष्कळ सयुक्तिक आणि अयुक्तिक चर्चा होत असते. पण हा स्त्रीस्वातंत्र्याचा थोडासा मासला आश्चर्यजनक आहे. व्यक्तिमात्राचें स्वभावबळ सर्व काळीं या जगांत असाच प्रभाव गाजवीत असतें. त्याबद्दल जुन्या नव्या काळांस हंसण्यांत फारसा अर्थ नाहीं. वधूचें दोन अडीच वर्षांचें वय व वर तिच्याहून चाळीस वर्षांनीं मोठा, असा विवाह मानवी दृष्टीनें विचित्र आहे! त्यांत सुज्ञतेचा फारच अल्पांश दिसतो. घरीं आल्यावर मुलीच्या बापास हा प्रकार कळला तेव्हां त्यांस फार दुःख झालें, आणि आपल्या एकुलत्या एका मुलीच्या भावी संसाराबद्दल त्यांस मोठी भीति वाटली. तिच्या भाळीं यावज्जन्म बालवैधव्यजन्य दुःसह यातना भोगणें लिहिलें आहे असें त्यांस दिसत होतें. आपल्या स्वेच्छाचारी स्त्रीबद्दल मोठा क्रोध येऊन त्यांस परम वैताग उत्पन्न झाला व त्यांत त्यांनीं तिचें नांव टाकलें. तात्काळ घर सोडून ते कोंकणांत जाऊन राहिले. मग बारा वर्षें त्यांनीं आपल्या स्वेच्छ बायकोचें तोंड पाहिलें नाहीं.

जगदीशाच्या अतुल दयेनें आपल्या दृष्टीनें असंभाव्य दिसणाऱ्या गोष्टी-

---

लग्नास एक महिना होतो न होतो तों त्यांचें तिसरें कुटुंब वारलें, तेव्हां तिची धाकटी बहीण आईबरोबर पाठराखणीस आलेली गांवांतील लोकांच्या आग्रहावरून व पूज्य मनुष्यांच्या आशीर्वादावरून तिच्या आईनें हरीपंतास दिली. लग्नाचे वेळेस मुलीचा बाप तेथें नव्हता. मुलीच्या आईनेंच हें विवाहकार्य लोकांच्या आग्रहावरून उरकून घेतलें. लग्नप्रसंगीं तिनें आपल्या पतीची संमति घेतली नाहीं आणि त्यांस तें मान्य होणार नाहीं असें ती जाणत होती. या तिच्या धारिष्टाचें आणि अविचाराचें नवल वाटणें साहजिक आहे. मुलीच्या बापानें आपल्या बायकोचें नांव टाकून आपल्या या एकुलत्या एक मुलीस दोन मुलें झाल्याखेरीज बायकोचें तोंड पाहणार नाहीं अशी प्रतिज्ञा करून तपासाठीं ते निघून गेले. ते सप्तशृंगीस तपश्चर्या करीत होते. मुलीस चार मुलगे झाल्यावर बायकोनें माणूस पाठवून त्यांस नातवंडांस पहाण्यास आणविलें. त्यांना ही बातमी कळल्याबरोबर त्यांनीं मुलीचे घरीं येऊन त्या नातवंडांस आनंदानें अवलोकन केलें. पुढें तेथेंच राहून त्या चार नातवांस थोडथोडी विद्या शिकविली व पुढें राजुरी मुक्कामीं ते मुलीच्या घरीं असतांना हें जग सोडून परलोकवासी झाले.

सुद्धां केव्हां केव्हां घडतात असें आपण पहातों. असाच प्रकार या विजोड वधूवरांचा झाला. त्यांचा संसाररूप वृक्ष चांगला वाढला. पल्लव, पत्र, पुष्प, फळ इत्यादिकांनीं तो बराच विस्तारला व त्यानें बराच भूपृष्ठभाग व्यापला. ही स्थिति विवाहकाळीं कोणीं कल्पिली असती तर त्याचें तें मनोराज्य पाहून त्यास सर्वांनीं वेडा म्हटलें असतें. पण या बालवधूची गोष्ट खरोखरच अशी झाली! लौकिकांत तिचा संसार चांगलाच थाटला, आणि तिलाही तो सुखदायक झाला. पण वैधव्यदशा तिला मुळींच भोगावी लागली नाहीं असें मात्र झालें नाहीं. चाळिशी उलटल्यानंतर पांच पुत्र आणि पांच कन्या होऊन व संसारसुखाचा अनुभव २५–३० वर्षें घेतल्यावर वैधव्यास्थिति तिला प्राप्त झाली. तेव्हां तशा स्थितींत या दुर्दशेचें अत्युग्र आणि यातनामय स्वरूप जितकें सौम्य होणें शक्य आहे, तितकें तें झालें होतें. अर्थात् विजोड व्हावयाचें जें नैसर्गिक फल तें या ठिकाणीं म्हणण्यासारखें दृष्टीस पडलें नाहीं. यावरून असे विवाहसंबंध अनिष्ट व निंद्य नव्हत, असें मात्र मानता येत नाहीं.

या बाईचें पूर्ववय बरेंच गरिबींत गेलें होतें. पण पुढें तिला चांगली संपन्न स्थिति प्राप्त झाली आणि ती शेवटपर्यंत टिकली. तिचे पांचही पुत्र चांगले कर्ते आणि सदाचारसंपन्न निघाले व त्यांचा उत्कर्ष तिनें पाहिला. सर्व मुलांनीं तिचा बोज चांगला राखला. तिला दुःख होण्यासारखें कोणीं कांहीं केलें नाहीं.

तिचा तिसरा पुत्र जनार्दन हा प्रस्तुत चारित्रनायकाचा पिता होय. त्यांनीं प्रथम दोन रुपयांची चाकरी धरून, वाढतां वाढतां ते कोल्हापूर संस्थानचे कारभारी झाले होते. त्या जागेवरून त्यांनीं पेनशन घेतलें. ते फार बुद्धिमान् होते. कोणत्याही विषयावर चटकदार लिहिण्याची हातोटी त्यांस फार चांगली साधली होती, असें त्यांचे बंधु म्हणत असत. कर्तव्यदक्षता, व्यवहारज्ञान, राजकीय डावपेंच, टापटीप इत्यादि भाग्योदयास लागणारे गुण त्यांचे अंगीं चांगले होते. त्यांत परिस्थिति अनुकूल राहिली व त्यांस थोर पद मिळालें. शेवटचीं बरींच वर्षें त्यांनीं राजुरीस सुखासमाधानांत घालविलीं. उत्तरावस्थेंत त्यांनीं संस्कृताचा व्यासंग केला, आणि रामायण, महाभारत, इत्यादि काव्यें टीकेवरून लावण्याइतकी त्यांची त्यांत गतिही झाली होती. दुसरेही धर्मविषयक ग्रंथ व काव्यें अभिरुचीनें व रस जाणून ते वाचीत असत.

आपल्या आईवर त्यांची मोठी भक्ति होती. तिची आज्ञा घेतल्यावांचून देवदर्शनासही ते जात नसत, असें म्हणतात. ते फार दयाशील होते. आपल्या कुटुंबांतील माणसांचा आणि आप्तांचा त्यांनीं चांगला परामर्ष घेतला, असा त्यांचा लौकिक आहे.

प्रस्तुत चरित्रनायकाचा जन्म राजुरी येथें भाद्रपद शुद्ध चतुर्थी शके १७६३ (सन १८४० इ.) या सालीं झाला, म्हणून त्याचें नांव विनायक असें ठेविलें. विनायकराव चार वर्षांचे झाल्यावर ते आपल्या वडिलांकडे कोल्हापुरास गेले. पुढें एक वर्षाचे आंतच त्यांची आई प्रसूतिरोगानें तेथें वारली. बालपणीं आई मरणें म्हणजे या आयुष्यांतल्या तीन मोठ्या आपत्तीं-पैकीं पहिली होय. ती त्यांजवर येऊन कोसळली, आणि मातृवात्सल्याच्या अनुपम सुखास ते आंचवले; परंतु बालपणांत त्याबद्दल त्यांस विशेष खंती वाटणें शक्य नव्हतें. पण पुढें सज्ञान स्थितींत आपल्या मातृहीनतेबद्दल निराशेचे उद्गार कधीं कधीं यांच्या मुखाबाहेर पडत असत. त्यांच्या जयपाळ नाटकांत मातृवात्सल्य व पुत्रप्रेम या मनोवृत्तींचें अत्यंत मनोहर आणि हृदयद्रावक चित्र प्रभावती, चंद्रकेतु व जयपाळ यांच्या संभाषणांत उठलें आहे. तें वाचून मन तल्लीन होतें. तें काढणाऱ्या कुशल चित्रकाराच्या स्वतःच्या भाग्यीं तें सुख लाभलें नसावें, हा विचार मोठा विषादजनक आहे.

कोणतीही गोष्ट अप्राप्य असली, म्हणजे तिचें महत्त्व आणि अपरूपता हीं विशेष भासतात. दिसण्यांत आणि असण्यांत मोठें अंतर असतें. सारें चकचकणारें सोनेंच असतें, असा नेम नाहीं. कोणत्याही स्थितीची निव्वळ कल्पना आणि तिचा अनुभव यांत फरक असावयाचाच. वरील पुत्रप्रेम आणि मातृवात्सल्य या सुखदायक मनोभावनांचा अनुभव आई विद्यमान असणाऱ्या किती थोड्या भाग्यवंत पुत्रांच्या प्राक्तनीं लाभत असेल बरें? ही ऐहिक स्थिति अत्यंत विषम व उद्वेगजनक आहे. दोन स्वभावांत पूर्ण सारखेंपण फारच क्वचित् आढळतें; किंबहुना मुळींच नाहीं म्हटलें तरी चालेल. त्यास निरनिराळ्या वासना, आवडनावड, व्यवसाय-व्यापृतत्व आणि तज्जन्य रुचिवैचित्र्य, इत्यादिकांचा संस्कार मतीस जडला आणि इतर अनेक गोष्टींची भर पडली, म्हणजे मूळची प्रेमळ वृत्ति फार कलुषित होते. त्यामुळें कविवर्णित मातृप्रेम व व्यवहारांतलें मातृप्रेम यांत फार अंतर असतें यांत नवल नाहीं.

हा प्रौढ वयांतला प्रकार झाला; पण मुलांच्याच संबंधानें पाहिलें, तर आई लहानपणीं मरण्यासारखी त्यांस दुसरी मोठी हानि नाहीं. लहानपणीं आईचें आपल्या मुलावरचें प्रेम अपार असतें. पण त्याची थोरवी लहान वयांत कळत नाहीं. व पुढें जाणत्या वयांत भिन्न आणि स्वार्थपर मनोभावनांच्या फेऱ्यांत फिरतांना हें प्रेम फारसें जागृत राहतें असें नाहीं. तसेंच सारासार विचारशक्ति आणि गुणदोषदृष्टि आली म्हणजे तें अबाधित राहतेंच, असा नेम नाहीं. त्याचप्रमाणें पुढें पुत्रप्रेम, पत्नीप्रेम, महत्त्वाकांक्षा, द्रव्यार्जन, इत्यादिकांनीं हृदय व्याप्त केलें म्हणजे आईचें महत्त्व बरेंच कमी वाटूं लागतें, असें व्यवहारांत आढळतें. ह्याप्रमाणें कल्पनावस्थेंतल्या व व्यवहारांतल्या हरएक वस्तुस्थितींत असेंच अंतर असलेलें प्रत्ययास येतें. पहिलींतील मनोहरता व अपरूपता दुसरींत फारशी आढळत नाहीं. ' दुसरींत गुणदोषमय स्थिति अनुभवास येते. आई प्रौढ वयापर्यंत जगती, तर कदाचित् आमच्या चरित्रनायकास या मातृप्रेमाची इतकी महती वाटली नसती. मातृहीनतेमुळें या मनोवृत्तीचें महत्त्व आणि अपरूपता त्यांस विशेष भासली असावी.

विनायकरावांच्या बाल्यावस्थेबद्दल कांहीं विशेष लिहिण्यासारखें नाहीं. आपल्या घरच्या तरुण विद्यार्थ्यांस सदुपदेश करतांना आपल्या स्वतःच्या विद्यार्जनकाळीं आपणही या स्थितीचा करावा तितका चांगला उपयोग केला नाही, यासंबंधांत क्वचित् प्रसंगीं ते खेदोद्गार काढीत असत, असें मला स्मरतें. जॉन स्टुअर्ट मिल् यांस ज्याप्रमाणें बालकाच्या कोंवळया मनास चांगलें वळण लावण्यांत कुशल अशा उदारधी बापाचा सहवास लाभला होता, किंवा सर्वभूतानुकंपा मूर्तिमंत मनांत ठसविणारी वत्सल माता मलबारी शेटजीचें लालनपालन बालवयांत करीत होती, तशा प्रकारच्या मातापित्याचा समागम प्रस्तुत चरित्रनायकास मिळाला नव्हता. त्यामुळें बालवयाविषयीं विचार मनांत आले तर त्यांस फारसें समाधान वाटत नसे, यांत मोठेंसें नवल नाहीं. सुशिक्षित आणि सुविचारसंपन्न झाल्यावर प्रौढदशेंत असतां आपल्या विद्यार्थिदशेकडे पाहून पूर्ण समाधान पावण्याचें फारच थोडयांच्या नशिबीं असतें. पुन्हां मार्मिक निरीक्षण केलें असतां पूर्ण समाधान देणारा असा आपल्या आयुष्यांतला भाग फारच अल्प सांपडतो, याचा प्रत्यय कोणास येत नाहीं !

लहानपणीं विनायकरावांची शरीरप्रकृति फार अशक्त होती. त्यांचा स्वभाव

तामसी व अतिशय संतापी असा होता. लहानमोठें न पाहतां प्रत्येकाच्या उत्तरास चापून प्रत्युत्तर देण्यास ते कमी करीत नसत. त्यांचें वाक्चापल्य पाहून सर्वजण मोठा अचंबा करीत, असें त्यांच्या घरचीं वडील माणसें सांगत. हें जर सत्य मानलें, तर पुढें प्रौढवयांत त्यांची ही वृत्ति फारशी दिसून येत नव्हती, हें आश्चर्य आहे. लहानपणीं त्यांची बुद्धि बरीच प्रखर होती, पण तिजहूनही त्यांची कल्पनाशक्ति अधिक तीव्र होती, असें दिसतें. याबद्दल त्यांच्या काकांनीं कांहीं माहिती मला दिली, ती खालीं देतोंः—

"विनायकरावांस लहानपणीं शाळेंत घातल्यावर त्यांचे गुरु एकदां म्हणाले कीं 'त्याची बुद्धि फार तीव्र आहे, आणि पाठशक्तिही चांगली आहे, पण त्याची धारणाशक्ति कमी आहे. त्यास पाठ लवकर होतें, पण तो लवकर विसरून जातो. त्याचा सोबती माधवराव ( न्या. रानडे ) याचें मात्र तसें नाहीं. त्यास पाठ होण्यास थोडा उशीर लागतो, पण एकदां झालें कीं मग तें वज्रलेप. पुन्हां दोन महिन्यांनीं पहिल्यासारखें पाहून घ्या."

विनायकराव दहा वर्षांचे असतांना कोणीं एकानें एक श्लोक म्हटला, तो आतां माझ्या स्मरणांत नाहीं; पण त्यांत दोन व्यक्तींमध्यें सोळा नातीं लागतात, असा कांहीं प्रकार होता. कीर्तने व रानडे या दोन घरांत या श्लोकानें लहानमोठ्या माणसांत मोठी गडबड उडाली. मोठी उरस्फोड करून कोणीं आठ दहा नातीं लावलीं. पण सोळा नात्यांचा बरोबर मेळ कोणास बसवितां आला नाहीं. शेवटीं विनायकरावांनीं दहा दिवसांनंतर सोळा नात्यांचा बितंबात उलगडा केला आणि तो सर्व लहानथोरांस मानवला !" यावरून लहानपणींच त्यांची कल्पनाशक्ति किती विशाल होती याचें अनुमान होतें.

सन १८५१ सालीं त्यांनीं इंग्रजी शिकण्यास आरंभ केला. ते बारा वर्षांचे असतां त्यांचे शाळेंत प्रसिद्ध महाराष्ट्र वक्ते महादेवशास्त्री कोल्हटकर आणि विष्णुबुवा ब्रह्मचारी हे दोघे आले होते. तेव्हां त्यांनीं लिहिलेला एक निबंध पाहून उभयतांनीं त्यांची फार वाहवा केली होती, असें त्यांचे बंधु रा. त्रिंबकराव कीर्तने यांनीं प्रस्तुत लेखकास कळविलें आहे. यावेळीं कोल्हापुरास इंग्रजी शाळा नवीनच स्थापन झाली होती. तींत त्यांनीं सन १८५६ इ. पर्यंत अभ्यास केला. आत्माराम नारायण आणि कृष्णाजी

चापाजी हे दोघे यावेळीं त्यांचे इंग्रजीचे शिक्षक होते. या उभयतांबद्दल चांगला किंवा वाईट उद्गार काढतांना मीं त्यांस कधींही ऐकलें नाहीं. त्यांची गुरुभक्ति अंध नव्हती, तर ती जागृत असे. सन १८८३ सालीं बडोद्यांत नायब दिवाणाच्या कामावर असतांना राजवैभवासह बड्या कामगार मंडळींत बसले असतां, सकाळीं ८ वाजण्याचे सुमारास त्यांचे लहानपणचे मराठी दमेकरी पंतोजी वयानें सुमारें ७६ वर्षांचे, वार्धक्यानें वांकलेले, गरीबसा पोषाख करून त्यांच्या भेटीस आले होते. दरवाज्याशींच त्यांस मज्जाव झाला. तितक्यांत त्यांस दम्याचा ठसका लागला. पुढें कांहीं वेळानें तो शांत झाल्यावर त्यांची आंत वर्दी लागली, तेव्हां त्यांस आंत बोलाविलें. ते आल्यावर विनायकरावांनीं उठून त्यांस अग्रस्थान दिलें आणि त्यांच्याशीं घटकाभर सन्मानपुरःसर भाषण करून नंतर त्यांस निरोप दिला, हा प्रकार मीं पाहिला आहे.

विनायकराव १३।१४ वर्षांचे असतां त्यांची प्रकृति क्षीण व्हावयास लागली होती. तेव्हां काशिनाथपंत ऊर्फ अण्णासाहेब गाडगीळ नामक कोल्हापुरच्या कामगारानें सहा महिने त्यांस आपल्या घरीं ठेवून कांहीं अंशीं त्यांजकडून व्यायाम करवून त्यांची तब्यत दुरुस्त केली. आतां त्यांचें शरीर बरेंच सशक्त झालें होतें. या गृहस्थाच्या विधवा स्त्रीस त्यांनीं इसवी सन १८७५ सालीं इंदुरास आणिलें होतें. तिजबद्दल त्यांच्या ठायीं मोठा पूज्यभाव वसत होता. तिच्याशीं ते मोठ्या बहुमानपूर्वक आणि भक्तिपुरःसर बोलत असतांना मीं पाहिलें आहे. इतका पूज्यभाव आपल्या इतर आप्तस्त्रीजनांच्यासंबंधानें त्यांनीं दाखवितांना मला कधीं दिसलें नाहीं.

आपल्या तामसी आणि अनियंत्रित वर्तनास आळा घालण्यास त्यांनीं आपल्या वयाच्या बाराव्या वर्षापासून आरंभ केला. त्याबद्दल त्यांनीं पुढील प्रसंग एकदां सांगितला—" बाराव्या वर्षी माझ्या आजीबाईबरोबर एकदां मी पंढरपुरास गेलों होतों. तेथें चंद्रभागेंत स्नानाचे वेळीं संकल्प सोडतांना आजी म्हणाली ' आजपासून हटवादीपणा, हूडपणा, संताप इत्यादि दुर्गुण सोडण्याचा संकल्प करून चंद्रभागेंत तूं पाणी सोड. ' त्याप्रमाणें मीं विशेष विचार न करतां गमतीनें पाणी सोडलें. यापुढें संताप चढला कीं मला या कराराची आठवण होई आणि मी आत्मसंयमन करण्याचा यत्न करीं.

एव्हांपासून माझा वर्तनक्रम सुधारण्यास आरंभ झाला." त्यांची आजी त्यांस प्रसंगोपात्त उपदेश करीत असे आणि तिच्या ठायीं त्यांची बरीच पूज्यबुद्धि वसत होती.

सन १८५१ सालीं कागल संस्थानच्या खेर उपनामक एका कुलीन गृहस्थाच्या मुलीशीं त्यांचा विवाह झाला. वधूचें वय वराच्या वयापेक्षां सव्वा वर्षानें लहान होतें आणि ती चांगली सशक्त, सुस्वरूप आणि सद्गुणसंपन्न अशी होती. दिसण्यांत हा विवाह योग्य होता असें वाटणार नाहीं. कारण, पूर्व वयांत विनायकरावांची शरीरप्रकृति अशक्त होती. तशांत त्यांची वृत्तिही स्वच्छंदी आणि अनियंत्रित होती. अशा स्थितींत त्यांचा विवाह सुखावह आणि कुशलपरिणामी होणें फारसें संभवनीय दिसत नव्हतें. तशांत वधू सशक्त व वर अशक्त; उभयतांचें केवळ सव्वा वर्षाचें वडीलधाकटेंपण; रुढींतल्या म्हणीप्रमाणें वरणभाताचा प्रकार होण्याचा संभव. असा विवाहयोग जुळवून आणणें मोठें धोक्याचें आणि जबाबदारीचें काम होय. या सर्व गोष्टींचा त्या वेळीं योग्य विचार झाला नाहीं, हें उघड दिसतें. विवाहसंबंधीं आमच्या लोकांच्या समजुती फार कोत्या व अविचारमूलक आहेत. विवाह म्हणजे एक अत्यावश्यक बाब होऊन बसली आहे. त्या स्थितीची जबाबदारी पत्करण्यास लागणारी कर्तृत्वशक्ति वराच्या अंगांत आहे किंवा कसें याचा यत्किंचितही विचार कोणी करीत नाहीं. वस्त्रपात्रादि आवश्यक गोष्टींप्रमाणें बायको होऊन बसली आहे. जनप्रवाहाबरोबर वाहत जाणारे लोक फार. गतानुगतिकत्वाचा पगडा लोकांवर जबरदस्त बसला आहे. तेव्हां विनायकरावांचे वडील या गोष्टीस अपवाद झाले नाहींत, यांत नवल नाहीं. ते तसे झाले असते, तर मात्र नवल झालें असतें.

आतां विनायकरावांबद्दल हा संभवनीय दिसणारा प्रकार घडून आला नाहीं, हें खरें आहे. "सानुकूलो जगन्नाथो विपरीतः सुपरीतो भवेत्" ॥ मानवदृष्टीनें संभवनीय दिसणाऱ्या गोष्टी कधीं विपरीत होतात, आणि असंभवनीय वाटणाऱ्या गोष्टी घडून येतात, असें पुष्कळ वेळां अनुभवास येतें. तथापि अशा स्थितींतही योजकांचा दोष कमी गणतां येत नाहीं.

पूर्व वयांत विनायकराव आपला अभ्यास लक्ष्यपूर्वक मेहनत घेऊन व काळजीनें करीत नसत, असें त्यांचे सहाध्यायी म्हणतात, आणि त्यांच्या

